श्री.

# श्री एकनाथस्वामीकृत

# अभंगांची गाथा.

भाग १-२.

OUT OF PRINT.

मुंबई.

इंदुप्रकाश छापखान्यांत छापिली.

सन १९०[illegible] इ.

# प्रस्तावना

## व

# श्रीएकनाथमहाराजांचें चरित्र.

श्रीभागवतवरानें केलें यश शुद्ध एकनाथानें ।
येणें प्रमुदित झाला साधु जसा बाळ सेवितां थानें ॥ १ ॥
ग्रंथ श्रीभागवत श्रीरामायण करी सुविस्तर ते ।
जरि न रचिता दयानिधि केवळ जड जीव तरि कसे तरते ॥ २ ॥

मोरोपंत.

कोणत्याही राष्ट्राचा मोठेपणा त्या राष्ट्रांतील व्यक्तींवर अवलंबून असतो. ज्या राष्ट्रांत प्रख्यात पुरुष जास्त होऊन गेले आहेत त्या राष्ट्राला कालचक्राच्या फेऱ्यांत सांपडून जरी कांहीं कालपर्यंत निकृष्टावस्था आली असली, तरी, विख्यात पुरुषांच्या पुण्यमय मूर्ति डोळ्यांपुढें असल्याकारणानें केव्हां ना केव्हां ऊर्जितावस्था येण्याचा संभव असतो. प्रसिद्ध पुरुषांचें स्मरण राष्ट्रांतील कर्त्या पुरुषांच्या अंगीं असणाऱ्या नैसर्गिक गुणांस चालन देतें व त्यामुळेंच त्यांचा विकास होऊन त्या पुरुषांच्या अंगीं योग्य महत्वाकांक्षा उत्पन्न करण्यास तें कारणीभूत होतें. याकरितां राष्ट्रांत पूर्वी होऊन गेलेल्या सुप्रसिद्ध व्यक्तींचीं चरित्रें व त्यांच्या कृति यांचें अवलोकन जितकें वारंवार होईल तितकें उत्तम. आपल्या महाराष्ट्रदेशांत अशा अनेक व्यक्ति होऊन गेल्या आहेत, व त्यांनीं आपापल्यापरी अनेक महत्कृत्यें केलीं आहेत. कित्येकांनीं आधिभौतिक सुखें या राष्ट्रास प्राप्त करून दिलीं आहेत तर कित्येकांनीं आध्यात्मिक सुखाचा रस्ता मोकळा करून दिला आहे. आध्यात्मिक सुख हें आधिभौतिक सुखापेक्षां श्रेष्ठ असल्यानें, त्याची ज्यांनीं स्वतः प्राप्ति करून घेतली व इतरांसही तें प्राप्त करून देण्याचा प्रयत्न केला, ते पुरुष आधिभौतिक सुखाची प्राप्ति करून देणारांपेक्षां श्रेष्ठ होत. अशा प्रकारच्या श्रेष्ठ पुरुषांमध्यें श्रीएकनाथांची गणना होते.

पूर्वी प्रतिष्ठान अथवा पैठण येथें भानुदास नांवाचा श्रीपंढरीनाथाचा एक निस्सीम भक्त रहात असे. तो एकनाथाचा पणजा. त्याला चक्रपाणी या नांवाचा एक पुत्र होता. त्याचा पुत्र सूर्यनारायण याला, त्याची पतिव्रता रुक्मिणी इचे उदरीं शके १४७० चे सुमारास जो पुत्र झाला, तोच एकनाथ होय. एकनाथ लहान असतांच त्याचीं मातापितरें परलोकवासी झालीं व त्याच्या पालनपोषणाचा सर्व भार त्याच्या वृद्ध आजाआजींवर पडला. एकनाथाच्या देवभक्तीचें लक्षण तो अगदीं लहान–बोबडे शब्द उच्चार करणारा होता–तेव्हांपासूनच स्पष्ट दिसूं लागलें. त्याचे ईश्वरभक्तिपर खेळ पाहून, हा ईश्वरी अंश आहे, असें त्याच्या आजाआजींस वाटूं लागलें. एकनाथाचें उपनयन त्याच्या वयाचे सहावे वर्षी झालें. त्याचा संस्कृत भाषेचा अभ्यास लहानपणींच संपला व तो तींत गुरूलाही कुंठित करूं लागला, तेव्हां त्याच्या विद्यागुरूनें आपलें भांडवल संपलें असें सांगून आपला मार्ग सुधारला. एकनाथाच्या मनांत वेदान्तशास्त्रासंबंधीं अनेक शंका येऊं लागल्या व या शंकांचें निराकरण करणारा गुरु केव्हां भेटेल अशी त्यास एकसारखी तळमळ लागली. याप्रमाणें मनाची स्थिति झाली असतां एकनाथ एके दिवशीं शिवालयांत गेला, तेथें 'देवगिरीगडावर दत्ताचा [illegible] झालेले जनार्दन स्वामी रहातात, त्यांजकडे जाऊन त्यांचा उपदेश घे' असा साक्षात्कार झाला. तेव्हां [illegible] तसाच

आपल्या आजाआजीला न विचारतां एकदम देवगिरीस जनार्दनपंताकडे गेला. जनार्दनपंतांसही एकनाथास पाहून अत्यानंद झाला. एकनाथानें साष्टांग नमस्कार घालून सद्गुरूची प्रार्थना केली,

' आशा तृष्णा कल्पना फार । देहीं वाढल्या अनिवार ॥
षड्वैरियांनीं गांजिलें फार । करीं उद्धार जीवाचा. ॥ १ ॥

यावरून जनार्दन स्वामींकडे एकनाथ गेला त्या वेळीं त्याची योग्यता मोठी असलेली स्पष्ट दिसते. नंतर जनार्दन स्वामींनीं हातीं धरून एकानाथास घरांत नेलें, आणि जेऊं घातलें. त्यानंतर एकनिष्ठेनें शागीर्दाप्रमाणें एकनाथानें स्वामींची सेवा ' मासें अयनें फार लोटे ' पर्यंत केली, असें महिपती ह्मणतो.

जनार्दन स्वामी हे देवगिरिच्या दरबारांत नोकर होते असें भक्तलीलामृतावरून दिसतें. एकनाथ तेथें असतां एके दिवशीं कोणी शत्रु ( महिपती नांव देत नाहीं ) शहरावर चढाई करून आला. त्याशीं तोंड देण्यासाठीं जनार्दनपंतांची योजना होऊन त्यांजकडे दूत आला. त्या वेळीं एकनाथ बाहेर कांहीं काम करीत होते, त्यांनीं हें ऐकतांच जनार्दन स्वामींचें स्वरूप घेऊन व त्यांचा पोषाक करून, त्यांचीं हत्यारें चढवून, परस्पर शत्रूवर चालून जाऊन त्याचा पराभव करून त्यास बांधून आणून राजाच्या स्वाधीन केला. दोनप्रहरीं जनार्दन स्वामी दरबारीं गेले. तेथें त्यांची फार स्तुति झाली, त्यावरून हें कृत्य एकनाथाचें असावें असें त्यांनीं ताडलें.

एके दिवशीं स्वामींनीं एकनाथांस हिशेब तपासून आणण्यास सांगितलें. हिशेबाचा ताळा पाहतां एका अधेल्याची चूक येऊं लागली, ह्मणून एकनाथ अडीच प्रहर रात्र होईपर्यंत चूक तपाशीत बसले. शेवटीं जेव्हां चूक सांपडली, तेव्हां त्यांनीं अत्यानंदानें मांडी थोपटली. जनार्दन स्वामींनीं हर्षाचें कारण विचारलें असतां तें नाथांनीं सांगितलें. त्यावर स्वामींनीं ' ऐसेंच कृष्णीं लावावें चित्त ' अशी आज्ञा केली.

एकनाथांनीं स्वामींची सेवा कशी केली तो प्रकार जिज्ञासूंनीं महीपतीच्या भक्तलीलामृतांत पहावा. या सेवेनें जनार्दनस्वामी संतुष्ट होऊन त्यांनीं एकनाथाला दत्तदर्शन करवून देण्याचा विचार केला. एके दिवशीं त्यांस शेजारच्या पर्वतावर नेऊन ' दत्तात्रेयाची स्वारी येथें येईल, परंतु ती कोणत्या वेषानें येईल याचा नेम नाहीं ' असें सांगून स्वामी दत्ताची मार्गप्रतीक्षा करीत राहिले. इतक्यांत फकीराच्या वेषानें दत्तात्रेय तेथें आले. त्यांचे बरोबर असणाऱ्या कामधेनूला त्यांनीं कुत्रीचें रूप दिलें होतें. दत्तांनीं कुत्रीचें दूध काढावयास जनार्दनस्वामींस आज्ञा केली. त्यांनीं एका मातीच्या भांड्यांत कुत्रीचें दूध काढलें व त्यांत फकीराच्या झोळींतील भाकरीचे तुकडे घालून उभयतांनीं त्याच मृत्तिकापात्रांत एकत्र भोजन केलें. उच्छिष्ट पात्र जनार्दनांनीं एकनाथाजवळ धुवून आणण्याकरितां दिलें. त्या पात्रांतील अवशिष्ट भाग एकनाथांनीं मोठ्या आनंदानें भक्षण केला. इतक्यांत जनार्दनांनीं एकनाथास जवळ बोलावून त्यांजवर अनुग्रह करण्याविषयीं दत्तात्रेयांस विनंति केली. दत्तांनीं प्रत्यक्ष दर्शन देऊन वरप्रदानही दिलें.

यानंतरही पुनः एकवार जनार्दनपंतांनीं एकनाथांस कसोटीला लावून पाहिलें. देवगिरीच्या पश्चिमेकडे असलेल्या सुलभ या नांवाच्या पर्वतावर जाऊन तपश्चर्या करण्यास स्वामींनीं नाथांस आज्ञा केली. त्याप्रमाणें ते तेथें बसून तपश्चर्या करीत असतां एक सर्प नेहमीं येऊन नाथांचें रक्षण करीत असे. ही गोष्ट एका साधु कुणब्यानें प्रत्यक्ष पाहून नाथांस सांगितली. त्या वेळीं नाथांनीं पुढील अभंग केला:—

आह्मा डंखूं आला काळ । तोचि जाहला कृपाळ ॥ १ ॥
भली वोळखी झाली आतां । चित्त मीनलेसें चित्ता ॥ २ ॥
देहीं फिटला देहभावो । तेथें काळचि झाला वावो ॥ ३ ॥
एका जनार्दनाचे पायीं । जिण्या मरण्या सौरस नाहीं ॥ ४ ॥

याप्रमाणें एकनाथांची सर्वत्र समदृष्टी झालेली पाहिल्यावर जनार्दनस्वामींनीं एकनाथांस आपणाबरोबर घेऊन तीर्थयात्रा केली. वाटेंत चंद्रभट नांवाचा एक ब्राह्मणहि या उभयतांबरोबर यात्रेस निघाला. त्यानें बरोबर चतुःश्लोकी भागवत घेतलें होतें, त्यावर एकनाथांनीं नाशीक येथें असतां महाराष्ट्र भाषेंत टीका केली. नंतर एकनाथांसह

स्वामी देवगिरीस परत गेले. तेथें समाधिसुखाचा अनुभव देऊन नंतर अनेक साधुसंतांचीं दर्शनें घडण्याकरितां पुनः यात्रेस जाण्यास, स्वामींनीं एकनाथांस आज्ञा केली.

एकनाथ घरांतून पळून गेल्यापासून त्यांची कोणत्याही तऱ्हेची खबर त्यांच्या आजाआजीला समजली नव्हती. चार पांच वर्षे गेल्यावर त्यांना एकनाथ जनार्दनपंताकडे गेल्याचा शोध लागला. जनार्दनपंतांनीं ते तीर्थयात्रेस गेल्याचें सांगून, ते पैठणास परत येतील त्या वेळीं त्यांस देण्याकरितां एक पत्र दिलें. पुढें उत्तरेकडील सर्व यात्रा संपवून दक्षिणेकडील यात्रा करण्याकरितां एकनाथ पैठणावरून चालले असतां त्यांना त्यांच्या आजाआजीनें ओळखून जनार्दन-पंतांचें पत्र दाखविल्यावरून ते तेथेंच राहिले.

एकनाथ पैठणांत राहिल्यावर त्यांनीं हरिकीर्तनाचा सपाटा चालविला. एकदा जनार्दनस्वामी मुद्दाम कृष्णजयंती-च्या उत्साहाकरितां देवगिरीहून पैठणास आले होते, त्या वेळीं नाथाच्या आजाआजींनीं एकनाथानें लग्न करावें, अशी आज्ञा देण्यास त्यांस विनंति केली, त्यावरून पंतांनीं एकनाथास लग्न करावयास आज्ञा केली.

एकनाथ गृहस्थाश्रमी झाल्यानंतरही त्यांची परमेश्वरभक्ति अखंड चालू होती. त्यांच्यावर अनेक संकटें आलीं व त्यांतून ते मोठ्या चमत्कारानें पार पडत गेले. ते सर्व प्रकार भक्तिलीलामृतांत महिपतींनीं रसभरित वर्णिले आहेत. त्यांपैकीं कांहींचा येथें निर्देश मात्र करितों. एकदा त्यांनीं पाषाणाच्या नंदीकडून गवत खावविलें. श्राद्धाचे दिवशीं प्रत्यक्ष मेलेले पितर बोलावून आणले. गोदावरींतून परीस काढून दाखविले. यांचें पुराण ऐकण्यास प्रत्यक्ष श्रीकृष्ण तेथें येत असत, व कांहीं कालपर्यंत एकनाथांच्या कीर्तनांत त्यांच्यामागें राहून ते ध्रुपद धरीत असत. इतकेंच नव्हे, तर त्यांचा आपणास समागम घडावा ह्मणून भगवंतांनीं त्यांच्या घरीं १४ वर्षे पाणी वाहिलें. याबद्दलची,

श्री एकनाथसदनीं माधवजी सर्व काम तें करितो ।
स्वकरें चंदन घांशी गंगेचें पाणि कावडी भरितो ॥

ही एक आर्या लहान मुलांच्याही पाठांत आली आहे.

एकनाथांनीं भागवताची पंचाध्यायी प्रथमतः मराठी ओव्यांमध्यें तयार केली. ती कोणी एक ब्राह्मण काशी येथें घांटावर वाचीत असतां तेथील पंडितांनीं पाहिली, व चौकशी करितां एकनाथानें भागवतावर नवीन टीका व ती मराठींत केली, असें त्यांस समजलें. हें सहन न होऊन एकनाथांची फजिती करण्याकरितां त्यांस काशीस बोलावून नेलें. तेथें गेल्यावर एकनाथांनीं पंडितांशीं वादविवाद करून त्यांस कुंठित केलें, परंतु तेवढ्यानें त्याचें समाधान न होतां त्यांनीं तो ग्रंथ गंगेंत फेंकून दिला. परंतु प्रत्यक्ष गंगेंत तो आपल्या हातांनीं झेलून घेतला, अशी भागवताबद्दल एक आख्यायिका प्रसिद्ध आहे.

नाथांनीं भक्तजनांच्या उद्धारार्थ पुष्कळ ग्रंथांची रचना केली. ते सर्व ग्रंथ रसभरित आहेत. त्यांमध्यें एकनाथी भागवत (भागवताच्या एकादशस्कंधावरील प्राकृत ओवीबद्ध टीका) आणि रुक्मिणीस्वयंवर हे दोन ग्रंथ फार प्रसिद्ध आहेत. तसेंच त्यांनीं भावार्थरामायण हें वीररसप्रधान काव्य रचून त्याच्या योगानें महाराष्ट्रीयांमध्यें वीरश्री जागृत केली. पुढें महाराष्ट्रांत जी मोठी थोरली राज्यक्रांति घडून आली तिचें बीज एकनाथांच्या वेळींच पेरलें गेलें असें ह्मणण्यास हरकत नाहीं. या वृक्षाचा पुढें विस्तार केवढा झाला, व महाराष्ट्रीयांस त्या वृक्षाचीं फळें जरी फारदिवस खावयास मिळालीं नाहींत, तरी त्याच्या छायेंत कांहीं वेळ बसावयास कसें सांपडलें, याचा येथें विस्तारानें विचार करण्याची जरूरी नाहीं. याशिवाय रामगीता, हस्तामलक, स्वात्मसुख, आनंदलहरी, चतुःश्लोकीभागवत वगैरे इतर एकनाथांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

एकनाथ जसे संस्कृत व मराठी भाषांमध्यें निष्णात होते, त्याप्रमाणेंच फारशी व आरबी भाषांमध्यें त्यांची चांगली गति होती, हें त्यांच्या कित्येक अभंगांवरून अगदीं स्पष्टपणें दिसून येतें. सध्या जसा विद्वत्ता अंगीं येण्यास इंग्रजी भाषेचा अभ्यास करणें भाग पडतें, त्याचप्रमाणें मुसलमानी अमलांत फारशी व आरबी भाषांचा अभ्यास व्यावहारिक अध्ययनास जरूर असे. मुसलमानी धर्माचीं तत्त्वें एकनाथांस उत्तम समजलेलीं होतीं. व त्यामुळें त्यांच्या आध्यात्मिक प्रगतीस कांहींशी मदत झाली होती, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

एकनाथांच्या काळीं मराठी भाषेमध्यें ग्रंथरचना करणें ही गोष्ट महत्वाची मानीत नसत, इतकेंच नव्हे, तर संस्कृत भाषेच्या अल्पस्वल्प अध्ययनानें दुर्विदग्ध झालेले अहंमन्य पंडित आपल्या अज्ञानाचें प्रदर्शन होईल या भीतीनें अशी रचना करणाराचा तिरस्कार करीत असत. कित्येक वेळां तर महाराष्ट्र भाषेची अवहेलनाही करीत असत, असें दिसतें. अशा प्रकारच्या प्रलापांकडे एकनाथांनीं विशेषसें लक्ष दिलें नाहीं, हें एकनाथी भागवतामध्यें मधून मधून त्यांनीं मराठी भाषेच्या थोरवीबद्दल जे उल्लेख केले आहेत त्यावरुन दिसून येईल. परंतु अशा प्रकारचा उल्लेख करितांना संस्कृत भाषेचा अपमान होईल असे उद्गार त्यांनीं कोठेंही काढलेले नाहींत. ज्यांना फक्त संस्कृत भाषा पूर्ण अवगत होती, त्यांजकडूनच ही मराठीची निंदा अथवा हेळसांड होत असे. असें ह्मणतां येणार नाहीं. याला कारणें काय असावीं, याविषयीं जरी आज आपणांस अनेक प्रकारच्या कल्पना करितां येतील, तरी त्या निवळ तर्कांच्या पायावर रचलेल्या असणार, ह्मणून तशा प्रकारचे केवळ शुष्क तर्क करीत न बसणें हेंच उत्तम होय.

या गाथ्यांत भक्तिमार्गपर अशा अभंगांचा संग्रह केला आहे. तसेंच एकनाथांनीं निरनिराळ्या प्रसंगांस उद्देशून किंवा धंद्यावर जीं बहुधा देहावरील रूपकें असलेलीं पद्यें रचिलीं आहेत त्यांचाही यांत समावेश केलेला आहे. लोकांच्या नित्य व्यवहारांतील गोष्टी पुढें करून त्यांच्या वर्णनामध्यें त्यांच्या त्यांच्या भाषाशैलीनें आत्मज्ञान गोवून दिलें असल्यामुळें अध्यात्म विषय सुबोध होण्यास तें एक फार उत्तम साधन झालें आहे. एकनाथांना जिकडे तिकडे एकच ब्रह्म दिसत होतें ही गोष्ट या विवेचनावरून सहज ध्यानीं येते. शिवाय, समाजांतील किती प्रकारच्या स्थितींचें त्यांनीं सूक्ष्मनिरीक्षण केलें होतें हें ध्यानांत येतें, व नाथांच्या या स्वभावाचें मोठें कौतुक वाटून त्यांच्या विषयीं पूज्यबुद्धि मनामध्यें उत्पन्न होते. बहुधा नित्यव्यवहारांतील मोठासा विषय त्यांच्या वाणींतून सुटलेला आढळावयाचा नाहीं. अशा दृष्टीनेंही ही नाथांची कृति फारच पूज्य व परिपूर्ण वाटते. अभंगांच्या पाठांतरामुळें कित्येक जागीं अर्थ फार बिकट झाला आहे, तेवढीं ठिकाणें सोडून दिलीं तर बाकीची त्यांची कविता सरळ व सुबोध आहे, असें दिसून येईल. थोड्याशा महाराष्ट्र भाषेच्या परिचयानें ही एकनाथांचीं पद्यें समजण्यास कठीण पडत नाहींत.

एकनाथांनीं आपल्या पवित्र आचरणाचा सर्व जनांस कित्ता घालून देऊन फाल्गुन वद्य ६ शके १५२० (२०!) रोजीं या नश्वर लोकाचा त्याग करून आपलें अवतारकृत्य संपविलें.

# अनुक्रमणिका.


| विषय. | पृष्ठ. |
|---|---|
| मंगलाचरण .... .... | १ |
| गुरुस्तुति .... .... | ३ |
| सद्गुरुस्तवन शतक १ लें. | ११ |
| ,, ,, २ रें. | १९ |
| दत्तात्रेयस्तुति .... .... | १९ |
| उपास्यदैवतपर अभंग .... | २७ |
| जनार्दनस्वामींचा बोध .... | २९ |
| विठ्ठलपर अभंग .... | ३१ |
| भक्तवात्सल्य .... .... | ४० |
| देवभक्तांचें ऐक्य .... | ४९ |
| सलगीचीं वचनें .... | ५३ |
| मनाचा संकल्प .... | ५४ |
| मनास बोध .... .... | ६९ |
| दश अवतारांची स्तुति.... | ६७ |
| संतांची स्तुति .... .... | ६९ |
| निवृत्ति महाराजांची स्तुति | ७६ |
| ज्ञानदेव महाराजांची स्तुति | ८० |
| सोपानदेव महाराजांची स्तुति | ८२ |
| मुक्ताबाईची स्तुति .... | ८४ |
| गुरूची मानसपूजा .... | ८५ |
| वैष्णवाची स्तुति .... | ८५ |
| सगुण स्वरूप .... .... | ८८ |
| करुणा .... .... | १११ |
| बिरहणी .... .... | १२२ |
| नामस्मरण बोध .... | १३३ |
| भक्तीविषयीं बोध .... | १६० |
| भक्तीचें महात्म्य .... | १६९ |
| भावाचें महात्म्य .... | १७१ |
| आत्मप्राप्ति. .... .... | १७४ |
| सत्समागम .... .... | २१५ |
| पुंडलिकाच्या भक्तीचें माहा. | २२० |
| संतसमागम .... .... | २२३ |
| नाममहिमा .... .... | २२९ |
| कीर्तनमाहात्म्य .... .... | २५० |
| पंढरीमाहात्म्य .... .... | २६५ |
| गंगागौरीचें भांडण .... | २८६ |
| खेळ .... .... | ३०८ |
| बालक्रीडेचे अभंग .... | २९० |
| गौळणींचे अभंग .... | २९४ |
| विटीदांडु .... .... | ३०९ |
| चेंडूफळी .... .... | ३१० |
| हमामा .... .... | ३१० |
| हुंबली .... .... .... | ३१० |
| एकीबेकी .... .... | ३११ |
| हुतुतु .... .... .... | ३११ |
| फुगडी .... .... | ३१२ |
| भोंवरा.... .... .... | ३१२ |
| लगोरी.... .... .... | ३१२ |
| पिंगा .... .... .... | ३१३ |
| खेळिया .... .... | ३१४ |
| सौरी .... .... .... | ३१५ |
| हरिपाठ .... | ३१८ |
| धांवा कयाधूचा .... | ३२४ |
| धांवा द्रौपदीचा .... | ३२५ |
| भूपाळ्या .... .... | ३२६ |
| पाळणे .... .... | ३२९ |
| हमामा पेंधा .... .... | ३२९ |
| कोल्हाटी .... .... | ३३० |
| यलमा .... .... | ३३१ |
| भांड .... .... .... | ३३२ |
| थाक .... .... .... | ३३२ |
| कबुलपत्र .... .... | ३३३ |
| भूतझडपणी .... .... | ३३४ |
| रावणाचा पराभव .... | ३३५ |
| झाडणी .... .... | ३३७ |
| अर्जदास्त .... .... | ३३९ |
| अभयपत्र .... .... | ३४० |
| हपशी सिद्धी .... .. | ३४० |
| कैकाय .... .... | ३४१ |
| डौर .... .... .... | ३४३ |
| कांडण .... .... | ३५४ |
| जोगीणीचक्र .... .... | ३५४ |
| जोहार.... .... .... | ३५५ |
| जोशी .... .... | ३६० |
| जाबचिठ्ठी .... .... | ३७६ |
| जंगम.... .... .... | ३७७ |
| मानभाव .... .... | ३७७ |
| जातें .... .... .... | ३७८ |
| जातें व दळण .... | ३७९ |
| फुलवरा .... .... | ३६९ |
| जोगवा .... .... | ३८० |
| चोपदार .... .... | ३८१ |
| येडका .... .... | ३८१ |
| चेंडुफळी .... .... | ३८२ |
| गारुडी .... .... | ३८२ |
| गारुडलेखन .... .... | ३८६ |
| गोंधळ.... .... .... | ३८६ |
| सर्प .... .... .... | ३९१ |
| विंचू .... .... .... | ३९१ |
| भूत .... .... .... | ३९२ |
| भोळी .... .... .... | ३९२ |
| किल्ला .... .... .... | ३९३ |
| बैल .... .... .... | ३९३ |

| विषय. | पृष्ठ. | विषय. | पृष्ठ. | विषय. | पृष्ठ. |
|---|---|---|---|---|---|
| कुत्रें .... .... .... | ३९४ | हिंदुतुर्कभांडण .... | ४२५ | वेडी .... .... .... | ४४४ |
| कानफाट्या .... .... | ३९४ | शकुन .... .... | ४३० | भाटी व मालखेडा .... | ४४४ |
| कावड .... .... | ३९५ | ताकीदपत्र .... .... | ४३१ | नवरोज जुल्हावा .... | ४५० |
| कापडी .... .... | ३९५ | पत्र .... .... .... | ४३२ | बहिरा.... .... .... | ४५२ |
| आंधळापांगळा .... | ३९७ | हुषारी .... .... | ४३३ | मुका .... .... .... | ४५२ |
| नानक .... .... | ३९८ | दिवटी .... .... | ४३३ | सरोदा १ ला.... .... | ४५३ |
| पांगूळ .... .... | ४०१ | पोर .... .... | ४३४ | पांगुळ.... .... .... | ४५५ |
| पिंगळा .... .... | ४०१ | मुलगी .... .... | ४३५ | डुगडुग्या .... .... | ४५५ |
| मुंढा .... .... .... | ४०२ | टिटवी .... .... | ४३५ | नीति .... .... .... | ४५६ |
| जोगी .... .... .... | ४०३ | पिंगळा .... .... | ४३६ | छापा .... .... .... | ४५७ |
| बाळसंतोष .... .... | ४०४ | बुलबुल .... .... | ४३६ | अभयदान .... .... | ४५८ |
| बाजेगारी .... .... | ४०५ | वटवाघुळ .... .... | ४३६ | थट्टा .... .... .... | ४५९ |
| भांड .... .... | ४०७ | पांखरूं .... .... | ४३७ | रहाट.... .... .... | ४६० |
| उदो .... .... | ४०९ | जगझोडी .... .... | ४३७ | दरवेश .... .... | ४६० |
| फ़कीर .... .... | ४१२ | झांप .... .... | ४३७ | महार .... .... .... | ४६१ |
| वेणु .... .... | ४१४ | मोती .... .... | ४३८ | महारीण १ ली. .... | ४६१ |
| सफेत कलंदर फकीर .... | ४१५ | मांग .... .... | ४३८ | महारीण २ री. .... | ४६१ |
| वासुदेव .... .... | ४१५ | चौघडा .... .... | ४३९ | महारीण ३ री. .... | ४६२ |
| गांवगुंड .... .... | ४१६ | बागुल .... .... | ४४० | कंजारीण .... .... | ४६२ |
| होळी .... .... | ४१७ | कुंटिण .... .... | ४४० | कोल्हाटीण .... .... | ४६३ |
| शिमगा .... .... | ४१७ | विवेकवैराग्य .... .... | ४४० | भटीण.... .... .... | ४६४ |
| सासुरवास .... .... | ४१७ | दादला .... .... | ४४१ | मरीआई .... .... | ४६४ |
| भूत .... .... | ४२१ | माळी .... .... | ४४१ | पोपट.... .... .... | ४६५ |
| सत्नामावली.... .... | ४२० | बायला .... .... | ४४१ | हाळदुली .... .... | ४६६ |
| नवल .... .... | ४२२ | जातें .... .... | ४४२ | धवळ.... .... .... | ४६९ |
| डोंबारी .... .... | ४२३ | कानोबा .... .... | ४४२ | जमाखर्च .... .... | ४७१ |
| नवलाई .... .... | ४२४ | गौळण .... .... | ४४३ | नवरी .... .... .... | ४७२ |
| बाजार .... .... | ४२५ | पांखरूं .... .... | ४४३ | घाणा .... .... .... | ४७३ |
| पोर .... .... | ४२५ | बाहुलें.... .... .... | ४४३ | आरत्या .... .... | ४७४ |
| भटीण .... .... | ४२५ | | | | |

श्री

# एकनाथमहाराजकृत

## अभंगांची गाथा.

( भाग पहिला. )

### मंगलाचरण.

१. श्रीमुख साजिरें कुंडलें शोभती ॥ शंख चक्र हातीं पद्म गदा ॥ १ ॥ पीतांबर कांसे वैजयंती कंठीं ॥ टीळक ललाटीं चंदनाचा ॥ २ ॥ मुगुट कुंडलें झळके पाटोळा ॥ घननीळ सांवळा विटेवरी ॥ ३ ॥ श्रीवत्सलांछन हृदयीं भूषण ॥ एकाजनार्दन तृप्त झाला ॥ ४ ॥

२. शाम[1] सुंदर मूर्ति विटेवरी साजिरी ॥ पाउलें गोजीरीं कोवळीं तीं ॥ १ ॥ ध्वज वज्रांकुश चिन्हें मिरवती ॥ कटी धरिले कर अनुपम्य शोभती ॥ २ ॥ ऐसा देखिला देव विठ्ठल माये ॥ एकाजनार्दनीं त्यासी गाये ॥ ३ ॥

३. कर कटावरी वैजयंती माळा ॥ तो हरी म्यां डोळां देखियेला ॥ १ ॥ रूप सांवळें शोभे विटेवरी ॥ तो हरि डोळेभरी देखियेला ॥ २ ॥ एका जनार्दनीं पहातां रूपडें ॥ त्रिभुवन थोकें[2]डें दिसतसे ॥ ३ ॥

४. उभा विटेवरी कट धरुनीया करीं ॥ पीतांबर साजिरी बुंथी[3] शोभे ॥ १ ॥ विठोबा विठोबा नामाचा हा छंद ॥ मन तें उद्बोध जडो पायीं ॥ २ ॥ त्रिअक्षर हें नाम जप हा परम ॥ तो मंगळधाम विठ्ठल माझा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं विठ्ठल कानडा ॥ देखिला उघडा विटेवरी ॥ ४ ॥

५. अर्पूनियां देवा भावाचे मोदक ॥ भावें विनायक पूजा करूं ॥ १ ॥ देखिलें गजमुख हरलें जन्मदुःख ॥ गेली तहानभूक मायाजाळ ॥ २ ॥ चित्त दूर्वादल अर्पूनी चरणीं ॥ गेलें हारपूनी कायावाचामन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विकट विनायक ॥ स्मरणेंची पातक नाशीतसे ॥ ४ ॥

---

१ काळी. २ थोडकें. ३ पांघरूण. ४ ज्ञानयुक्त. ५ कर्नाटकांतील. ६ मन हेंच अर्थ दूर्वा.

६. सुखाचें मस्तक हरिखाचें तोंड ॥ आनंदाची सोंड झेलीतसे ॥ १ ॥ जयगणनाथा जयगणनाथा ॥ सहज निजसत्ता नाच तूं अद्वैत ॥ धृ० ॥ सच्चित् आनंद स्वानंदाचें दोंद ॥ मिरवे नागबंध बोधाचार ॥ २ ॥ नर-कुंजर रूपें अद्वैत एक ॥ एकपणें कौतुक नृत्याचें तें ॥ ३ ॥ रंगीं मुसावला हरिखें स्वानंद मोदक ॥ देत विनायक निजभक्तां ॥ ४ ॥ सिद्ध विनायक सिद्धीचा उपरमू ॥ एकाजनार्दनी हेरंब परब्रह्म ॥ ५ ॥

७. प्रथम नाटारंभीं आनंदकदंब ॥ आरंभीं हेरंब वंदियेला ॥ धृ० ॥ जय आरंभ हेरंबा ॥ परमानंदें रंगीं नाचें निजशोभा ॥ १ ॥ नाना अवतार वेषें दावी तूं गमकें ॥ रंगीं रंग मूर्ति नाचे निजसुखें ॥ २ ॥ अभय वरद हस्तें मुसावला रंगू ॥ जीवशीव प्रयोगु एक झाले ॥ ३ ॥ उपरमल्या श्रुति निगम नेति नेती ॥ रंगीं स्वानंद मूर्ति डुल्लतसे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं चिक्रट विनायक ॥ रंगीं तुष्टला देत स्वानंद मोदक ॥ ५ ॥

८. नमन माझें गजवदना ॥ सर्व भावें धरी चरणा ॥ १ ॥ जो हा गौरीहरबाळ ॥ भक्ता लागीं तो दयाळ ॥ २ ॥ विघ्नें निवारी क्षणांत ॥ लंबोदर एकदंत ॥ ३ ॥ त्याचें स्मरण करी जो सदा ॥ तया देई परमानंदा ॥ ४ ॥ एकाजनार्दना शरण ॥ सद्गुरु तोचि गजानन ॥ ५ ॥

९. सारासार कथा वागदेवता ॥ अक्षरीं अक्षरता वदवी स्वयें ॥ १ ॥ जय सारजे जय सारजे ॥ जय सारजे निजसार जें निजरूप ॥ धृ० ॥ मुक्त मोतियें सेवी अहर्निशीं ॥ तये परम हंसीं आरूढ ॥ २ ॥ स्वरवर्ण वीणा वेदार्थ पोथी ॥ स्वानंदें सरस्वती वदवी स्वयें ॥ ३ ॥ शुद्ध शुक्लवास चिदानंदें कास ॥ रंगी सावकाश वागेश्वरी ॥ ४ ॥ सकळारंभीं निजा सहजीं सहजा ॥ एका जनार्दनीं एकत्वें सारजा ॥ ५ ॥

१०. मर्दुनी शंखासुरा हातें वागविसी कलीवरा ॥ तेवीं निवटोनी अहंकारा माझ्या वागविशी शरीरा ॥ १ ॥ येथें नवल नव्हे पहा हो ॥ माझा देहची वागवी देवो ॥ २ ॥ शंख वाजविशी नाना स्वरा ॥ तें तंव न बाधी शंखासुर ॥ ३ ॥ तैसी चेतऊनी माझी गिरा ॥ बोली बोलविता तूं खरा

---

१ कटदोरा. २ हत्ती आणि मनुष्य. ३ हर्ष. ४ गायनाचे स्वर. ५ शांत झाल्या. ६ वेद.

॥ ४ ॥ कर्म कार्य कर्तव्यता ॥ माझेंनि नांवें तूंचि आतां ॥ ५ ॥ एका जनार्दनीं निजात्मता ॥ कर्म करून नित्य अकर्ता ॥ ६ ॥

११. जन्मा आलों मीं संसारीं ॥ सखी मानिली अंतुरी ॥ निंदा केली द्विजवरीं ॥ कैसा सद्गुरु जोडेल ॥ १ ॥ नाहीं पूजिलें गुरुवरा ॥ नाहीं नमिलें द्विजवरां ॥ नाहीं केलें भजन सारां ॥ कैचा भैव[2] हा आटेल ॥२॥ जालों परधर्मीं रत ॥ अधर्म करितां वाटे हित ॥ जन्म मरणाचीं खंत ॥ कैसी आतां वाटेल ॥३॥ संसारीं मीं दुखावलों ॥ त्रिविध तापें मीं पोळलों ॥ दुःखी होउनीया आलों ॥ औदुंबरीं या ठायां ॥ ४ ॥ आंकलैखोप[3] कृष्णा-तिरीं ॥ गुरु वसती औदुंबरीं ॥ भक्तवत्सला तारीं तारीं ॥ ह्मणउनी चरण वंदिले ॥ ५ ॥ जनार्दन पापरासी ॥ करूनी आलों तुजपाशीं ॥ तारिसील या भरंवसीं ॥ धरणें घेतलें दारांत ॥ ६ ॥

---

## गुरुस्तुति.

१. नमूं जाय जंव गुरुत्वा ॥ तंव त्रैलोक्य आलें गुरुत्वा ॥ १ ॥ आतां नमना नुरेची गुरू ॥ गुरुत्वा आला संसारू ॥ २ ॥ वंद्यत्वें[4] नमूं गुरुभेदें ॥ तंव त्रैलोक्य गुरुत्वें नांदे ॥ ३ ॥ गुरुवांचुनी न दिसे कांहीं ॥ तंव सान थोर अवयवें गुरु पाहीं ॥ ४ ॥ थोर गुरुत्वा आलें गौरव ॥ तरी गुरु नामें नेघे अहंभाव ॥ ५ ॥ एका जनार्दनाच्या पायीं ॥ नमूं गेलों तों गुरु शिष्य नाहीं ॥ ६ ॥

२. स्वरूप मंदिरीं होतें मी एकली ॥ माया सांजवेळ अविद्येचे वेळीं ॥ माझें तुझें चालतां पाउलीं ॥ मोहो भुजंगें धरिली करांगुळी ॥ १ ॥ लोभ्न सर्प डंखला करूं काय ॥ स्वार्थ संपत्तीनें जड झाला पाय ॥ आशा लहरी तापला माझा देह ॥ तृप्तिवारा घाली वो गुरुमाय ॥ २ ॥ भजन गूळ तो मज कडू झाला ॥ विषयनिंब बहु गोडिये आला ॥ वित्तहानि गळां झेंडू आला ॥ असत्य अशुद्धाच्या येताती गरळा ॥ ३ ॥ कामिनीकामाची डोळां आली पीतता ॥ रसस्तुति निंदा काळे झाले दांत ॥ विकल्प वास-

---

१ उत्तम ब्राह्मणांस. २ संसार. ३ गांवाचें नांव. ४ पूज्यपणानें. ५ शिष्यांची इच्छा.

नेच्या मुंग्या धांवत ॥ स्त्रीपुत्र लोभें पडली भ्रांत ॥ ४ ॥ मीपणाची थोर आली भुली ॥ मी येथें कोण वोळखी मोडली ॥ अहंविवेकें[1] काया जड झाली ॥ सद्गुरु गारुडी बोलवा माउली ॥ ५ ॥ गुरु गारुडी आला धांवुनी ॥ बोधवैराग्याचें पाजिलें पाणी ॥ विवेकअंजन घातलें नयनीं ॥ सोहं शब्द वाजवी नामध्वनी ॥ ६ ॥ मिथ्याभूतमय अवधि स्थिति ॥ अभयस्वरूपीं[2] लाविली विभुती[3] ॥ उतरला सर्प निवारली भ्रांती ॥ एका जनार्दनीं आलीसे प्रचिती ॥ ७ ॥

३. सर्वभावें दास झालों मी उदास ॥ तोडिलों मायापाश जनार्दनें ॥ १ ॥ माझें मज दावियलें माझें मज दावियलें ॥ उघडें अनुभविलें परब्रह्म ॥ २ ॥ रविबिंबापरि प्रकाश तो केला ॥ अंधकार पळविला काम क्रोध ॥ ३ ॥ बांधलों होतों मायाममतेच्या पाशीं ॥ तोडिलें वेगेंसीं कृपादृष्टी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं उघडा बोध दिला ॥ तोचि ठसावला हृदयामाजीं ॥ ५ ॥

४. मोकळें तें मन ठेविलें बांधोनी ॥ जनार्दनचरणीं सर्वभावें ॥ १ ॥ स्थिर मति जाली वार्ता तीही गेली ॥ द्वैताची फिटली सर्व सत्ता ॥ २ ॥ मोह आशाबद्ध कर्मा निवारलों ॥ पावन तो जालों संतचरणीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धन्य संतसेवा ॥ उगविला गोंवा[4] गुंती सर्व ॥ ४ ॥

५. धन्य धन्य सद्गुरुराणा ॥ दाखविलें ब्रह्मभुवना ॥ १ ॥ उपकार केला जगीं ॥ पावन जालों आह्मी वेगीं ॥ २ ॥ पंढरी पाहतां ॥ समाधान झालें चित्ता ॥ ३ ॥ विटेवरी समचरण ॥ एका जनार्दनीं निज खूण ॥४॥

६. सांपडलों होतों श्रमाचिया जाळीं ॥ माया मोह कल्लोळीं भ्रमत सदां ॥ १ ॥ परि जनार्दनें केलासें मोकळा ॥ दवडुनी अवकळा आशा तृष्णा ॥ २ ॥ मीनाचिये परि तळमळ संसारीं ॥ माझें माझें भोंवरीं दृढ भरीत ॥ ३ ॥ तें परतें करूनी केलेंसें सरतें ॥ आपणा परौतें[5] जाऊं नेदी ॥ ४ ॥ जनार्दनाचा एका लडीवाळ तान्हा ॥ पाजी प्रेम पान्हा जनार्दन ॥ ५ ॥

---

१ मी कोण या विचारानें. २ परब्रह्मस्वरूपीं. ३ समाधी. ४ गुरफटागुरफट. ५ पलीकडे.

७. देव तो आह्मा जनार्दन ॥ शास्त्र तें आह्मा जनार्दन ॥ पुराण आह्मां जनार्दन ॥ सर्वभावें ॥ १ ॥ सुख जनार्दन दुःख जनार्दन ॥ कर्म धर्म जनार्दन ॥ सर्वभावें ॥ ध्रु० ॥ योग जनार्दन याग जनार्दन ॥ पुण्य आणि पाप तेंही जनार्दन ॥ २ ॥ यापरि सर्वस्व अर्पी जनार्दन ॥ एका-जनार्दनीं साधे भजन ॥ ३ ॥

८. कोटि कंदर्पांच्या[1] श्रेणी[2] ॥ कुर्वंडीत जनार्दनी ॥ १ ॥ बरवा जनार्दन जनीं ॥ पहातां तनुमन भुलवणी ॥ २ ॥ नयन लाचावले दोन्ही ॥ आन न दिसे त्रिभुवनीं ॥ ३ ॥ शंकरासी झाला गोड ॥ काय इतरांचा पाड ॥ ४ ॥ रूपा भाळला कंदर्प ॥ तेणें कृष्णा केला बाप ॥ ५ ॥ रमा रमणीय सर्वांसीं ॥ झाली चरणाची दासी ॥ ६ ॥ सनकादिक अति विरक्त ॥ तेही पदीं आसक्त ॥ ७ ॥ जनीं जनार्दन नेटका ॥ एकाएकीं चरणीं देखा ॥ ८ ॥

९. अवघेंचि त्रैलोक्य आनंदाचें आतां ॥ चरणीं जगन्नाथा चित्त ठेलें ॥ १ ॥ माय जगन्नाथ बाप जगन्नाथ ॥ अनाथाचा नाथ जनार्दन ॥ २ ॥ एका जनार्दनीं एकपणें उभा ॥ चैतन्याची शोभा शोभलीसे ॥ ३ ॥

१०. दीनाचा दयाळ ॥ जया दासाची कळवळ ॥ १ ॥ तो हा सद्गुरु दयाळ ॥ पायीं ठेवियलें भाळ ॥ २ ॥ न विचारी कुळ याती ॥ शुची[3] चांडाळ निश्चिती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भावें ॥ एकवेळ त्यासी गावें ॥ ४ ॥

११. स्वजनीं[4] जनार्दन विजनीं जनार्दन ॥ जीव तो जनार्दन जीवनकळा ॥ १ ॥ जनक जनार्दन जननी जनार्दन ॥ जन तो जनार्दन होउनी ठेला ॥ २ ॥ भाव जनार्दन स्वभाव जनार्दन ॥ देव जनार्दन जेथें तेथें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आकळे[5] जनार्दन ॥ एका जनार्दन निश्चळ तेथें ॥ ४ ॥

१२. आमुचिये कुळीं दैवत सद्गुरू ॥ आह्मांसी आधारु पांडुरंग ॥ १ ॥ सद्गुरु आमुची माता सद्गुरु तो पिता ॥ सद्गुरु तो भ्राता[6] आह्मा लागीं ॥ २ ॥ इष्टमित्र बंधु सज्जन सोयरे ॥ नाहीं पैं दुसरें गुरुविण ॥ ३ ॥

१ मदनाच्या. २ पंक्ति. ३ पवित्र. ४ संसारामध्यें. ५ ताब्यांत येतो. ६ भाऊ.

सद्गुरु आचार सद्गुरु विचार ॥ सद्गुरुचि सार साधनांचें ॥ ४ ॥ सद्गुरूची क्षेत्र[1] सद्गुरु तो धर्म ॥ गुरु गुह्य वर्म आह्मालागीं ॥ ५ ॥ सद्गुरु तो यम[2] सद्गुरु नियम[3] ॥ सद्गुरु प्राणायाम आह्मांलागीं ॥ ६ ॥ सद्गुरु तो सुख सद्गुरु तो मोक्ष ॥ सद्गुरु प्रत्यक्ष परब्रह्म ॥ ७ ॥ सद्गुरुचें ध्यान अखंड हृदयीं ॥ सद्गुरुच्या पायीं वृत्ति सदा ॥ ८ ॥ सद्गुरुचें नाम नित्य आह्मा मुखीं ॥ गुणातीत सुखीं सद्गुरुराज ॥ ९ ॥ एका जनार्दनीं गुरुरूपीं दृष्टी ॥ दिसे सर्व सृष्टि परब्रह्म ॥ १० ॥

१३. जन्मोजन्मींचें संचित ॥ गुरुपायीं जडलें चित्त[4] ॥ १ ॥ तें तो सोडिल्या न सुटे ॥ प्रेमतंतु तो न तुटे ॥ २ ॥ दुःखें[5] आदंळलीं वैरपडा ॥ पाय न सोडी हा धडा ॥ ३ ॥ देह गेला तरी जावो ॥ गुरु चरणीं दृढ भावो ॥ ४ ॥ वरी पडोत पाषाण ॥ परि न सोडीं गुरुचरण ॥ ५ ॥ ऐका जनार्दनीं निर्धार ॥ तेथें प्रगटे विश्वंभर ॥ ६ ॥

१४. आतां जय न कैसा परी ॥ संसारा न्गेहे उरी ॥ १ ॥ सद्गुरु वचन मंत्र अरणी ॥ तेथोनी प्रगटला निर्धूम अग्नी ॥ २ ॥ सकळीं सकळांच्या मुखें ॥ अर्पीतसे यज्ञपुरुषें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं यज्ञें अर्पी ॥ अर्पी त्यामाजीं समर्पी ॥ ४ ॥

१५. खांबसूत्राची[6] बाहुली ॥ सूत्रा आधीन उगलीं ॥ १ ॥ माझें मीपण नाहीं स्वतंत्र ॥ क्रियाकर्म तें परतंत्र ॥ २ ॥ बाहुलिये नाहीं स्वतंत्रता ॥ तैसा नव्हे कर्मकर्ता ॥ ३ ॥ एका एकपणाचें सूत्र ॥ जनार्दन पायीं स्वतंत्र ॥ ४ ॥

१६. श्रीगुरुकृपें दत्त वोळखिला ॥ हृदय डोल्हाऱ्यावरी बैसविला ॥ अभेद पूर्ण चांदवा तेथें दिला ॥ शुद्ध भक्तीनें दत्त पूजीयेला ॥ १ ॥ दत्त चरणीं मज लागलीसे गोडी ॥ भवभयाची तुटोनी गेली बेडी ॥ ध्रु० ॥ सोहं गुढी तेथें उभारिली ॥ मंत्र उपदेशें देह बुद्धि गेली ॥ पूर्ण निवृत्ति प्रवृत्ति ही धाली ॥ सहज पूर्णानंद पूर्णता आली ॥ २ ॥ जिकडे पाहे तिकडे चक्रपाणी ॥ बोलावयाची राहिली शिराणी ॥ जनीं वनीं एकात्मता खाणी ॥ एका जनार्दनीं रंगलीसे वाणी ॥ ३ ॥

---

१ पवित्रभूमि. २, ३ योगसाधनें. ४ अंतःकरण. ५ दुःखित. ६ कळसूत्री. ७ कौतुक.

१७. न सोडींरे मना गुरु जनार्दना ॥ संसारबंधना सोडविलें ॥ १ ॥ संसार अजगर झोंबला विखार ॥ धन्वंतरी थोर जनार्दन ॥ २ ॥ जनार्दना ऐसी माउली परियेसी ॥ बहु कष्टें सायासीं जोडियेली ॥ ३ ॥ जनार्दनें रंक तारियेला एका ॥ संसारीं हा सखा जनार्दन ॥ ४ ॥

१८. तारिलें वो येणें श्रीसद्गुरु नायकें ॥ बोधाचिये कासे लाउनी कवतुकें ॥ १ ॥ या भवसागरीं झालासी तूं तारू[1] ॥ परतोनिया पाहों कैंचा मायापुरू ॥२॥ एकाजनार्दनीं कांडियें ॥ संचला प्रपंच लाऊनि थेडिये[2]॥३॥

१९. भजतां भजन एक जनार्दन ॥ ब्रह्म परिपूर्ण सर्वे एक ॥ १ ॥ सांडुनी वासना भजतां भजन ॥ ब्रह्म परिपूर्ण सर्व एक ॥ २ ॥ विषय वासना त्यागितां संपूर्ण ॥ ब्रह्म तें संपूर्ण सर्व एक ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकत्व भाव ॥ तेथें नांदे देव संदेह नाहीं ॥ ४ ॥

२०. जय जय वो जनार्दन ॥ विश्वव्यापक संपूर्ण वो ॥ सगुण अगुण विगुण पूर्ण पूर्णानंदघन वो ॥ १ ॥ ब्रह्मा विष्णु रुद्र निर्माण तुजपासुनी वो ॥ गुणत्रयें[3] उभय वनीं तूंची पंचक अंतःकरणीं वो ॥ व्यापुनी पंचक प्राण दश इंद्रिय करणीं वो ॥ पंचक विषय स्थानें पंच विषयांचे स्वामिनी वो ॥ २ ॥ स्थूळ लिंग कारण चौथें महाकारण वो ॥ जागृती स्वप्न सुषुप्ति तुर्या उन्मनी हे स्थान वो ॥ नेत्र कंठ हृदय मूर्ध्नि[4] या प्रमाण वो ॥ विश्व तैजस प्राज्ञ प्रत्यगात्मा तूं संपूर्ण वो ॥ ३ ॥ स्थूळ प्रविविक्त सुख चौथें आनंदाभास वो ॥ पिंड ब्रह्मांड आणिक तूं ॐकाराचें सुख वो ॥ त्वंपद तत्पद आणिक असि पद[5] तें तूं एक वो ॥ ४ ॥ आजी पंचका कारण षट्चक्राचें भेदन वो ॥ मंत्र तंत्र स्थानीं अनावराचें आवरण वो ॥ नसोनी एकपणीं एका एकीं जनार्दन वो ॥ ५ ॥

२१. एका जनार्दनाचे लग्न सिद्धीसी ॥ घटितार्थ तें पहावया मिनले चवदा भुवनाचे ज्योतिषी ॥ १ ॥ योग तोही एक तीथ तीही एक ॥ राशि तेही एक नक्षत्र तेंही एक ॥ सद्गुरुचरणीं एका एक तोही झाला ॥ २ ॥ वर्ष तेंही एक मास तोही एक ॥ बारा योग पहातां एका एक

---

१ नावाड्यानें. २ तीरास. ३ सत्व, रज, तम. ४ मस्तक. ५ 'तत्वमसि' महावाक्यांतील तीन पदें.

झाले ॥ ३ ॥ घटिका तेही एक पळ तेंही एक ॥ शोधितां सूक्ष्म एका एकाचि झालें ॥ ४ ॥ पाहतां जनीं जनार्दनीं झाली एक नाडी ॥ ह्मणवोनी एका जनार्दनीं उभविली गुढी ॥ ५ ॥

२२. नेणें मंत्र तंत्र बीजाचा पसारा ॥ जनार्दन सोईरा घडला मज ॥ १ ॥ भक्ति ज्ञान विरक्ति नेणें पैं सर्वथा ॥ मोह ममता चिंता कांहीं नेणें ॥२॥ योग याग कसवटी[1] कांहीं नेणों आंटो ॥ सर्व देखों सृष्टि जनार्दन ॥३॥ काया वाचा मन ठेविलें चरणीं ॥ एका जनार्दनीं सर्व भावें ४

२३. जनार्दनीं शोभित जन ॥ जनार्दनें साचार ज्ञान ॥ जनार्दनें आकळे मन ॥ ध्याता ध्येय ध्यान जनार्दन ॥ १ ॥ जनार्दनु मुखकमळीं ॥ जनार्दनु नयनीं ग्याहाळी ॥ हृदयकमळीं जनार्दनू ॥ २ ॥ जनार्दनें बोलिला वेदू ॥ जनार्दनें बुद्धीसी बोधू ॥ जनार्दनें तोडिला भेदू ॥ परमानंदु जनार्दनू ॥ ३ ॥ जनार्दनें ज्ञानदृष्टी ॥ जनार्दनें पावन सृष्टी ॥ जनार्दनें संतुष्ट पुष्टी[3] ॥ निजभावें भेटी जनार्दनें ॥ ४ ॥ सर्व ज्ञान डोळसू ॥ जनार्दन स्वयंप्रकाशू ॥ जनार्दन देहबुद्धि निराशू ॥ परमहंसु जनार्दनू ॥ ५ ॥ जनार्दनें नित्य नवा रंग ॥ जनार्दनें वैष्णव संग ॥ वोडवे रंग जनार्दनें ॥ ६ ॥ जनार्दनें सुख होय सुखा ॥ जनार्दन पाठीराखा ॥ जनार्दनें तारिला एका ॥ आह्मा निजसखा जनार्दन ॥ ७ ॥

२४. माथा ठेवोनी पाव ॥ माझा देहींच केला देव ॥ १ ॥ नवलाव[4] पायाचा मी केला ॥ माझा देहींचा देवपणा नेला ॥ २ ॥ पाय पराक्रम पंचानन ॥ पायीं निरसला देह अभिमान ॥ ३ ॥ पायीं देहासी पाहे ठावो ॥ पायीं देहचि केला वावो[5] ॥ ४ ॥ नवल पायाचा हा भावो ॥ पायीं नुरेचि देहीं देवो ॥५॥ एका जनार्दनाच्या पायीं ॥ देह विदेह दोन्ही नाहीं ६

२५. ग्यां गुरु केला ग्यां गुरु केला ॥ सर्व बोध तेणें मज दिला ॥ १ ॥ घालूनिया भक्ति अंजन ॥ दावियेलें निधान ॥ २ ॥ कांन फुंकुनी[6] निगुती ॥ दिधलें संताचिये हातीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं गुरु बरा ॥ तेणें दाविलें परात्परा ॥ ४ ॥

---

१ कसोटी. २ त्रास. ३ भक्तिमार्ग. ४ नवल, आश्चर्य. ५ व्यर्थ. ६ उपदेश देऊन.

२७. जप जनार्दन तप जनार्दन ॥ स्वरूप जनार्दन जनीं वनीं ॥ १ ॥ कर्म जनार्दन धर्म जनार्दन ॥ ब्रह्म जनार्दन जनसाहित ॥ २ ॥ योग जनार्दन याग जनार्दन ॥ भोग जनार्दन अहर्निशीं ॥ ३ ॥ ध्येय जनार्दन ध्यान जनार्दन ॥ एका जनार्दन ज्ञानरूप ॥ ४ ॥

२८. ध्येय ध्याता ध्यान ॥ अवघा माझा जनार्दन ॥ १ ॥ आसन शयन मुद्रा[2] जाण ॥ अवघा माझा जनार्दन ॥२॥ जप तप यज्ञ यागपण ॥ अवघा माझा जनार्दन ॥ ३ ॥ भुक्ति मुक्ति स्थावर जाण ॥ अवघा माझा जनार्दन ॥ ४ ॥ एकाएकीं वेगळा जाण ॥ अवघा भरला जनार्दन ॥ ५ ॥

२९. जनार्दनं माय जनार्दन बाप ॥ जनार्दन ताप निवारिती ॥ ॥ १ ॥ जनादन बंधु जनार्दन भगिनी ॥ जनार्दन निर्वाणीं मजलागीं ॥ ॥ २ ॥ जनार्दन सखा जनार्दन चुलता ॥ जनार्दन तत्वता प्राण माझा ॥ ॥ ३ ॥ जनार्दन सुहृद[3] जनार्दन मित्र ॥ पवित्रापवित्र जनार्दन ॥ ४ ॥ जनार्दन जन जनार्दन विजन ॥ माझें तनमन जनार्दन ॥ ५ ॥ जनार्दन ऐश्वर्य जनादन धन ॥ मज निरंजन जनार्दन ॥ ६ ॥ जनार्दन जीव जनादन भाव ॥ जनार्दन शिव मजलागीं ॥ ७ ॥ जनार्दन पिंड[4] जनार्दन ब्रह्मांड ॥ जनार्दन अखंड परब्रह्म ॥ ८ ॥ एका जनार्दनीं वृत्ति होय लीन ॥ झालासे तल्लीन परब्रह्मीं ॥ ९ ॥

३०. जनार्दनें कृपा केली ॥ वृत्ति ब्रह्माकार झाली ॥ १ ॥ धन्य धन्य जनार्दन ॥ तया पायीं मम वंदन ॥ २ ॥ मन मनपणा हरपलें ॥ तन्मय होऊनियां ठेलें ॥ ३ ॥ चित्त चिंतना विसरलें ॥ चैतन्यरूप होऊनी ठेलें ॥ ४ ॥ निश्चयरूप जे कां बुद्धि ॥ परब्रह्म तें निरवधी ॥ ५ ॥ अहंपणें अहंभाव ॥ तोही झाला देवाधिदेव ॥ ६ ॥ श्रोत्रेंद्रियें[5] ग्राह्य शब्द ॥ होऊनि राहिला निःशब्द ॥ ७ ॥ त्वगिंद्रिय स्पर्श ॥ तो पैं जाहला परेश ॥ ८ ॥ नेत्रें पाहती रूपातें ॥ तें पैं परब्रह्म आं[6]थें ॥ ९ ॥ जिव्हा सेवितसे रस ॥ तें हें ब्रह्म स्वयंप्रकाश ॥ १० ॥ घ्राण सेवितसे गंध ॥ तें हें परात्पर निर्द्वंद्व ॥ ११ ॥ वाणी उच्चारी वचन ॥ तें हें परब्रह्म जाण

१ रात्रदिवस, २ योगमार्गांतील खेचरी, गोचरी, वगैरे. ३ मित्र. ४ देह. ५ कान. ६ असलेलें.

॥ १२ ॥ गमन करिताती पाद ॥ तें हें ब्रह्म परम पाद ॥ १३ ॥ पाणीं-द्रियें घेणें ॥ तेंचि ब्रह्म परिपूर्ण ॥ १४ ॥ गुह्येंद्रियाचा आनंद ॥ तो हा झाला परमानंद ॥ १५ ॥ जे जे क्रिया घडे अंगीं ॥ ते ते ब्रह्मरूप जगीं ॥ १६ ॥ पंचप्राण ते अमूप ॥ परब्रह्माचें स्वरूप ॥ १७ ॥ स्थूल सूक्ष्म ते कारण ॥ सकल ब्रह्म परिपूर्ण[1] ॥ १८ ॥ महाकारण प्रकृति ॥ परब्रह्माची आकृति ॥ १९ ॥ अन्नमयकोश[2] ॥ परब्रह्माचा विकाश ॥ २० ॥ कोश तोही प्राणमयं ॥ दिसे प्रत्यक्ष चिन्मय ॥ २१ ॥ मनोमयं कोश जाण ॥ परात्परा परिपूर्ण ॥ २२ ॥ कोश विज्ञान पहावा ॥ द्रष्ट दृश्यातीत आघवा ॥ २३ ॥ कोश जाणावा आनंद ॥ तो हा केवळ परमानंद ॥ २४ ॥ समष्टिव्यष्टयात्मकं जग ॥ तें हें परब्रह्म अभंग ॥ २५ ॥ जनार्दन जनवन जनार्दन निरंजन ॥ २६ ॥ एका जनार्दनीं भाव ॥ एकनाथ झाला देव ॥२७॥

३१. व्यापक हा जनार्दन ॥ जगचि भरला संपूर्ण ॥ १ ॥ मागें पुढें आहे उभा ॥ काय वाणूं त्याची शोभा ॥ २ ॥ भरुनी उरला ॥ सर्वां-ठायीं तो संचला[3] ॥३॥ शरण एका जनार्दनीं ॥ व्यापक तो जनीं वनीं ४

३२. उघड दाखविलें देवा ॥ नाहीं सेवा घेतली ॥ १ ॥ ऐसी प्रेमाची माउली ॥ जगीं व्यापक व्यापली ॥ २ ॥ नाहीं घालित भार कांहीं ॥ आठव देहीं रामकृष्ण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण ॥ मन माझें नेलें चोरून ॥ ४ ॥

३३. कायावाचा मनें ॥ कृपाळू दीना कारणें ॥ १ ॥ ऐसा समर्थ तो कोण ॥ माझ्या जनार्दना वांचून ॥ २ ॥ माझें मज दाखविलें ॥ उघड वाचें बोलविलें ॥ ३ ॥ जनीं जनार्दन ॥ एका तयासी शरण ॥ ४ ॥

३४. गेलों गुरुलागीं शरण ॥ माझें हरपलें मी तूंपण ॥ १ ॥ द्वैत भाव गेला देशोधडी ॥ बोध दिला मज संवगडी[4] ॥ २ ॥ मंत्र सांगे त्रिअक्षर ॥ परात्पर निज घर ॥ ३ ॥ जपतां मंत्र लागलें ध्यान ॥ सहज खुटलें मीतूंपण ॥ ४ ॥ एका जनार्दनीं समाधी ॥ सहज तुटली उपाधी ॥ ५ ॥

---

१ हात २ हे पांच कोश आहेत ह्यांजवर आत्म्याचा भास होतो ३ सांठवला. ४ मित्र.

३५. मज करूं दिली नाहीं सेवा ॥ दाविलें देवा देहींच ॥ १ ॥ जगद्व्यापक जनार्दन ॥ सदा वसे परिपूर्ण ॥२॥ भिन्न भिन्न नाहीं मनीं ॥ भरलासे जनीं वनीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण ॥ सर्वाठायीं व्यापक जाण ॥ ४ ॥

३६. शिष्यापासून सेवा घेणें ॥ हें तों लक्षण अधमाचें ॥ १ ॥ ऐसे असती गुरु बहू ॥ नव्हेची साहूं भार त्यांचा ॥२॥ एकपणें समानता ॥ गुरु शिष्य उरता उपदेश ॥३॥ एका जनार्दनीं शरण ॥ गुरु माझा जनार्दन ॥४॥

३७. उपाधीच्या नांवें घातियेलें शून्य ॥ आणिका दैन्यवाणें काय बोलूं ॥ १ ॥ टाकूनियां संग धरियेला देव ॥ आतां तो उपाव दुजा नाहीं ॥ २ ॥ सर्व वैभव सत्ता तयाचे पदरीं ॥ जालों अधिकारी आह्मीं बळें ॥ ३ ॥ एका जनार्दना तोडियेला संग ॥ जालों आह्मीं निःसंग हरिभजनीं ॥ ४ ॥

३८. येव्हढें जया कृपेचें करणें ॥ रंक मिरवती राज्यपणें ॥ १ ॥ तो हा कल्पतरु गुरु जनार्दनू ॥ छेदी देहाभिमानु भवकंदु[2] ॥ २ ॥ कृपेचे वोरसें[3] धांवे कामधेनू ॥ तैसा माझा मनु वेधिलासे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तयावांचूनी कांहीं ॥ दुजें पहाणें नाहीं मनामाजीं ॥ ४ ॥

---

## सद्गुरुस्तवन शतक १ लें.

दत्तराया करूं प्रथम नमन ॥ द्वितीय चरणा सद्गुरुच्या ॥ १ ॥ सद्गुरुच्या चरणा करावा प्रणाम[4] ॥ मुखीं नित्य नाम सदा जप ॥ २ ॥ नित्य जपा वाचे गुरुराजस्वामी ॥ तेणें सुखधामीं प्राप्त व्हाल ॥ ३ ॥ प्राप्त व्हाल तुह्मीं आत्यंतिक[5] सुखा ॥ जेथें जन्मदुःखा पार नाहीं ॥ ४ ॥ पार नाहीं वेदां शास्त्रें मौनावलीं ॥ पुराणें तीं झालीं मौनरूप ॥ ५ ॥ मौनरूप शेष ब्रह्मा आणि इंद्र ॥ सूर्य अग्नि चंद्रा अंत नाहीं ॥ ६ ॥ अंत नाहीं त्याचा अनंत स्वरूप ॥ अनिर्वाच्य रूप सद्गुरूचें ॥७॥ सद्गुरूचें रूप तें स्वयंप्रकाश ॥ दृश्यीं जो प्रकाश सद्गुरूचा ॥ ८ ॥ सद्गुरूचा प्रेमा माझीया अंतरीं ॥ अनुभव साक्षात्कारीं झाला असे ॥ ९ ॥ झाला

---

१ जग भरून राहिलेला. २ संसाराचें मूळ. ३ पान्हाऊन. ४ नमस्कार. ५ सर्वांत अधिक.

असे अनुभव अपरोक्ष ॥ शास्त्रीं जे विवक्षा केली असे ॥ १० ॥ केली असे स्तुति संत महानुभावी ॥ सद्गुरु वदवी मजलागीं ॥ ११ ॥ मजलागीं त्यांनीं दिली असे वाचा ॥ उपकार तयांचा काय वानूं ॥ १२ ॥ काय वानूं माझ्या सद्गुरु दयाळा ॥ बहुत कळवळा ज्यासी माझा ॥ १३ ॥ ज्यासी माझा प्राण अर्पण मीं केला ॥ देह हा विकिला सर्वस्वें मीं ॥ १४ ॥ सर्वस्वें मी वसें सद्गुरुचे पायीं ॥ अन्य प्रिय नाहीं मजलागीं ॥ १५ ॥ मजलागीं दया केली गुरुरायें ॥ हृदयीं ते पाय धरीयेले ॥ १६ ॥ धरीयेले जीवीं पाऊलें कोंवळीं ॥ कंठीं एकावळी नाममाळा ॥ १७ ॥ नाममाळा कंठीं शोभे ही साजिरी ॥ हृदयीं गोजिरी गुरुमूर्ती ॥ १८ ॥ गुरुमूर्ति वसे ज्याचे हृदयकमळीं ॥ तया चंद्रमौळी[2] मागें पुढें ॥ १९ ॥ मागेंपुढें उभा राहे तो रक्षित ॥ कांहींच आघात येवों नेदी ॥ २० ॥ येवों नेदी कदा कल्पनेची बाधा ॥ आणिक आपदा[3] शिष्यालागीं ॥ २१ ॥ शिष्यालागीं गुरु करिताती बोध ॥ स्वरूप स्वानंद देती तया ॥ २२ ॥ देती तया गुरु अनुपम सुख ॥ स्वानंद कौतुक त्यासी लाभे ॥ २३ ॥ त्यासी लाभे आत्मा सर्व अंतर्यामी ॥ चिन्मय सुखधामीं पहूडे[4] तो ॥ २४ ॥ पहूडे तो न ये कदा काळीं देहा ॥ तोचि निःसंदेहा पावलासे ॥ २५ ॥ पावलासे ब्रह्म अखंड परात्पर ॥ सारासार विचार करोनियां ॥ २६ ॥ करोनियां जेणें नित्य स्नानसंध्या ॥ दोषांची ते बाधा वारीयेली[5] ॥ २७ ॥ वारीयेली जेणें चित्तविक्षेपता[6] ॥ करोनि उपास्यता सगुणमूर्ती ॥ २८ ॥ सगुण मूर्तिसी न ह्मणावें माइक ॥ शास्त्र आत्यंतिक सांगतसे ॥ २९ ॥ सांगतसे शास्त्र देवध्यान करा ॥ विक्षेप तो वारा चित्ताचा पैं ॥ ३० ॥ चित्ताचा गेलीया विक्षेप सकळ ॥ आवरण केवळ राहिलेंसे ॥ ३१ ॥ राहिलेंसे जया स्वरूपावरण ॥ त्याचें निवारण ज्ञानें होय ॥ ३२ ॥ ज्ञानें होय परी ज्ञान प्राप्तीलागीं ॥ साधनें तीं अंगीं विवेकादि ॥ ३३ ॥ विवेक वैराग्य शमादि तें षट्क ॥ चौथी ते देख मुमुक्षुता ॥ ३४ ॥ मुमुक्षुतेपुढें श्रवण मनन ॥ तें निज ध्यासन पाहिजे कीं ॥ ३५ ॥

---

१ बोलणें. २ शंकर. ३ संकटें. ४ झोंपतो. ५ नाहींशी केली. ६ मनाचा भ्रम.

पाहिजे कीं तत्वंपदार्थ शोधन ॥ साधनें हीं जाण अंतरंग ॥ ३६ ॥
अंतरंग साधनें करावीं परमार्थां ॥ त्यागावीं सर्वथा बहिरंगें ॥ ३७ ॥ बहि-
रंग साधनें होय स्वर्गप्राप्ति ॥ निष्कामीं होती चित्तशुद्धि ॥ ३८ ॥
चित्तशुद्धि झाल्या अतरंगा अधिकार ॥ विवेक निर्धार सांगतसों ॥ ३९ ॥
सांगतसों आतां विवेकाचें तथ्य ॥ ब्रह्म हेंची सत्य जगन्मिथ्या ॥ ४० ॥
मिथ्या माया काय जगत प्रकार ॥ ब्रह्म हेंचि सार विवेक हा ॥ ४१ ॥
विवेक हा स्मरा अनुभव करा ॥ वैराग्य अवधारा एकाचित्तें ॥ ४२ ॥
एकचित्तें करा वैराग्यश्रवण ॥ तेणें समाधान स्वरूपीं होय ॥ ४३ ॥
स्वरूपीं होय स्थिति वैराग्याच्या योगें ॥ अन्न विषसंगें सेवूं नये ॥ ४४ ॥
सेवूं नये विषय वमनाचे परी ॥ वीट तो अतरीं सदा असो ॥ ४५ ॥
सदा असो प्रीति परमार्थालागीं ॥ विषयविरागी याचें नांव ॥ ४६ ॥
याचें नांव शम मनाचा निग्रहो ॥ विषयीं आग्रहो चित्ता नाहीं ॥ ४७ ॥
चित्ता नाहीं कधीं विषयाची स्फूर्ति ॥ अतरीं हे वृत्ति झाली असे ॥ ४८ ॥
झाली असे सर्व इंद्रियां स्थिरता ॥ दम हें तत्वता ह्मणती त्या ॥ ४९ ॥
ह्मणती त्या उपरम स्वधर्मासी ॥ त्यागावें विधींसी सर्वस्वेंची ॥ ५० ॥
सर्वस्वेंची शीत उष्णातें साहणें ॥ तितिक्षा ह्मणणें तयालागीं ॥ ५१ ॥
तयालागीं श्रद्धा ह्मणताती जनीं ॥ सद्गुरु वचनीं विश्वास तो ॥ ५२ ॥
विश्वास असावा वेदांतांचे ठायीं ॥ सद्गुरूचे पायीं लीन व्हावें ॥ ५३ ॥
लीन व्हावें चित्त सद्गुरुवचनीं ॥ तोचि समाधाना प्राप्त झाला ॥ ५४ ॥
प्राप्त झाला प्राणी मुमुक्षुतेलागीं ॥ प्रपंच संसर्गीं विटला तो ॥ ५५ ॥
विटला संसारा आणि घरदारां ॥ पुत्र परिवारां मिथ्या मानी ॥ ५६ ॥
मिथ्या मानी सर्व प्रपंच वैभव ॥ विषयांचें नांव नावडे ज्यासी ॥ ५७ ॥
नावडे ज्यासी इष्ट मित्र ते सोयरे ॥ परमार्थीं वेहेवरे चित्त ज्याचें ॥ ५८ ॥
चित्त ज्याचें झालें प्रपंचीं विरक्त ॥ त्याचे मनीं आर्त सद्गुरु भेटी
॥ ५९ ॥ सद्गुरु भेटी व्हावी ऐसें ज्याचे मनीं ॥ तो सर्वांलागुनी
विचारित ॥ ६० ॥ विचारीत मला सद्गुरु कें भेटती ॥ रात्रंदिवस चित्तीं

१ शीतोष्ण, मानापमान, सुखदुःखादि द्वंद्वांचें सहन. २ उद्योग करितें. ३ इच्छा.

दुजें नाहीं ॥ ६१ ॥ दुजें नाहीं तया आणिक जगांत ॥ सद्गुरु सर्वत्र दिसतसे ॥ ६२ ॥ दिसतसे गुरु आसनीं शयनीं ॥ आणिक भोजनीं गुरु दिसे ॥ ६३ ॥ गुरु दिसे जागृतीं स्वप्न आणि [1]सुषुप्ति ॥ आनंद नेणती गुरूवीण ॥ ६४ ॥ गुरूवीण जनीं न दिसे ज्या अन्य ॥ चित्त होय धन्य गुरुभेटी ॥ ६५ ॥ गुरुभेटी होतां चित्त स्थिर होय ॥ तळमळ जाय मनाची तें ॥ ६६ ॥ मनाची ते शांति होतां पाय धरी ॥ दंडवत करी वेळोवेळां ॥ ६७ ॥ वेळोवेळां गुरुसी करी नमस्कार ॥ जोडोनियां कर उभा राहे ॥ ६८ ॥ जोडोनियां हात पुढें गुरुराया ॥ बोलत सखया तारा स्वामी ॥ ६९ ॥ तारा स्वामी मज भवाचे सागरीं ॥ व्हावें कर्णधारी मजलागीं ॥ ७० ॥ मजलागीं गुरो तुमचा आधार ॥ ओस [2]चराचर तुह्माविण ॥ ७१ ॥ तुह्माविण सखा मज नाहीं कोणी ॥ वाटतें चरणीं घालूं मिठी ॥ ७२ ॥ घालूं मिठी पायां सद्गुरु समर्था ॥ तेणें निज स्वार्था पावसील ॥ ७३ ॥ पावसील सुखा सद्गुरु माउली ॥ ती मज [3]गौवली शिष्य वत्सा ॥ ७४ ॥ शिष्य वत्सालागीं पाजी ज्ञानदुग्ध[4] ॥ तेणें देह शुद्ध होय त्याचा ॥ ७५ ॥ देह त्याचा केला ब्रह्म हा गुरूनें ॥ काया वाचा मनें चरण धरी ॥ ७७ ॥ चरण धरीतसे शिष्य वेळोवेळां ॥ माझा कळवळा असो तुह्मां ॥ ७७ ॥ तुह्मांवीण मज कोण हो तारील ॥ दीन उद्धरेल कैशापरी ॥ ७८ ॥ कैशापरी मज होईल सुटका ॥ प्रपंच लटिका वाटे केव्हां ॥ ७९ ॥ केव्हां वाटे मज जगत हें मिथ्या ॥ ब्रह्माचें सत्यत्व केव्हां पावे ॥ ८० ॥ केव्हां पावे मज स्वरूपाची शांति ॥ तें मज निश्चिती सांगा स्वामी ८१ ॥ सांगा स्वामी मज कृपा हो करूनी ॥ शिष्य विनवणी करी ऐशी ॥ ८२ ॥ करीं ऐशी दया मज गुरुराया ॥ लागतसे पायां शिष्यराज ॥ ८३ ॥ शिष्यराज झाली अष्टभावप्राप्ति ॥ सद्गुरूंनीं हातीं धरीयेला ॥ ८४ ॥ धरीयेला करीं नेला एकांतांत ॥ अंकीं बैसवीत सद्गुरुराव ॥ ८५ ॥ सद्गुरुराव त्यासी बोलती त्या क्षणीं ॥ लागली उन्मनी तयालागीं ॥ ८६ ॥ तयालागीं नाहीं देहाचा आठव ॥ स्थूल

---

१ झोपेंत २ हालणारें किंवा न हालणारे पदार्थ. ३ गाय. ४ ज्ञान हेंच दूध.

सूक्ष्मभाव मावळले ॥ ८७ ॥ मावळले देह चारी अवस्था ॥ शिष्य तो तत्वतां ब्रह्म झाला ॥ ८८ ॥ ब्रह्म झाला त्याचा देह आत्मस्थिती ॥ द्वैताद्वैत प्रतीति नाहीं जया ॥ ८९ ॥ नाहीं जया सुख दुःखाची भावना ॥ समूळ वासना निरसली ॥ ९० ॥ निरसली त्याची अहंकार कल्पना ॥ सुखदुःख यातना नाहीं तया ॥ ९१ ॥ नाहीं तया जीवशीवभेदाभेद ॥ समूळ हे वाद मिथ्या झाले ॥ ९२ ॥ मिथ्या झाले ज्ञान ज्ञेय आणि ज्ञाता ॥ भोग्य भोग भोक्ता मावळला ॥ ९३ ॥ मावळला तेव्हां द्वैतप्रपंच ॥ एक ब्रह्म साच अनुभाविलें ॥ ९४ ॥ अनुभविलें तेणें अनुभव वेडावला ॥ विचार निमाला जिये ठायीं ॥ ९५ ॥ जिये ठायीं गति नाहीं षट् प्रमाणा ॥ साधन लक्षणां ठाव कैचा ॥ ९६ ॥ ठाव कैचा तेथें परादिकां[१] वाचां ॥ जेथें त्या शब्दाचा लाग नाहीं ॥ ९७ ॥ लाग नाहीं तेथें उपपत्ति युक्ति ॥ अपरोक्ष प्रतीति लया गेली ॥ ९८ ॥ लया गेली तया स्थानीं मज ठेविलें ॥ सद्गुरु दयाळें दीनानाथें ॥ ९९ ॥ दीनानाथें तया ठायीं निजविलें ॥ नवजाती[२] वर्णिलें गुण तया ॥ १०० ॥ एकाजनार्दन गुरुपायीं लीन ॥ ब्रह्म परिपूर्ण अनुभविलें ॥ १०१ ॥

## सद्गुरुस्तवन शतक २ रें.

नमो सद्गुरुराया दीनाच्या वत्सला ॥ पावावें दासाला ब्रीद तुझें ॥ १ ॥ ब्रीद तुझें जगीं पतीतपावन ॥ भक्तासी रक्षणें सर्व काळीं ॥ २ ॥ सर्व काळीं भक्त आठविती तूज ॥ ब्रीदाची हे लाज धरणें लागे ॥ ३ ॥ धरणें लागे तूज भक्ताचा अभिमान ॥ आश्रय त्या कोण तुझ्याविणें ॥ ४ ॥ तुझ्याविणें त्यासी नाहीं कोणी सखा ॥ संसार पारिखा[३] वाटे त्यासी ॥ ५ ॥ वाटे त्यासी माझा आधार सद्गुरु ॥ इच्छा मी कां करूं आणिकाची ॥ ६ ॥ आणिकाची इच्छा कासया करावी ॥ प्रपंची ते गोवी जेणें होय

१ परा, पश्यती, मध्यमा आणि वैखारी चार वाचांस. २ जात नांहींत. ३ परका.

॥ ७ ॥ जेणें होय प्राण्या जन्ममरणदुःख. ॥ तया आत्मसुख भेट नाहीं ॥ ८ ॥ भेट नाहीं जया आत्मापरमात्म्याची ॥ हानी नरदेहाची केली तेणें ॥ ९ ॥ केलीं तेणें जरी जपतपें फार ॥ नाहीं त्या आधार गुरूविना ॥ १० ॥ गुरूविना प्राण्या नव्हेचि सद्गती ॥ ऐसें वेदश्रुति बोलताती ॥ ११ ॥ बोलताती सिद्ध, साधु महानुभाव ॥ गुरूविण वाव सत्कर्में तीं ॥ १२ ॥ सत्कर्में ती वाव चित्त शुद्ध करा ॥ तेणें पाय धरा सद्गुरूचे ॥ १३ ॥ सद्गुरूचे पाय जयासी लाधले ॥ तेणें निरसिलें प्रपंचासी ॥ १४ ॥ प्रपंचासी बाध केला गुरुदासें ॥ चरणीं विश्वास ठेवोनियां ॥ १५ ॥ ठेवोनियां जीव सद्गुरूचे पायीं ॥ प्रपंच व्यवसायीं वागतसे ॥ १६ ॥ वागतसे जनीं परि तो विजनीं ॥ भेदभाव मनीं नाहीं जया ॥ १७ ॥ नाहीं जया चित्तीं आणिक वासना ॥ सद्गुरु वचना विश्वासला ॥ १८ ॥ विश्वासला मनें सद्गुरु चरणीं ॥ प्रेम अन्यस्थानीं नाहीं ज्याचें ॥ १९ ॥ नाहीं ज्याचें तन मन आणि धन्न ॥ गुरुसी अर्पण केलें असे ॥ २० ॥ केलें असे. जेणें निष्काम[1] तें कर्म ॥ चित्तशुद्धी वर्म[2] हाता आलें ॥ २१ ॥ हातां आलें जया चित्ताचें तें स्थैर्य ॥ सद्गुरु आचार्य भेटले त्या ॥ २२ ॥ भेटले त्या मायबाप सद्गुरुराव ॥ दयासिंधु नांव असे ज्यासी ॥ २३ ॥ असे ज्यासी सर्व श्रुति अध्ययन ॥ ब्रह्मपरायण अहर्निशीं ॥ २४ ॥ अहर्निशीं चित्त ब्रह्मींचि रंगलें ॥ विषय उरलें नाहीं जया ॥ २५ ॥ नाहीं जया काम क्रोधाची भावना ॥ आणिक वासना नानापरी ॥ २६ ॥ नानापरी जग जरी देखियेलें ॥ ब्रह्म हें भरलें ओतप्रोत ॥ २७ ॥ ओतप्रोत आत्मा स्वरूप जयासी ॥ तयासी द्वंद्वासी भेटी कैंची ॥ २८ ॥ भेटी कैसी तया सुखदुःखद्वंद्वा ॥ लोभ मोह आपदा[3] नाहीं त्यासी ॥ २९ ॥ नाहीं त्यासी मनीं द्वैताद्वैत नांव ॥ आत्मस्थिति भाव सर्व जगीं ॥ ३० ॥ सर्व जगीं दिसे ब्रह्मरूप ज्यासी ॥ उपमा तयासी काय देऊं ॥ ३१ ॥ काय देऊं जगीं नसे त्यासमान ॥ स्वयंप्रकाशमान[4] सद्गुराज ॥ ३२ ॥ सद्गुराजानें केली मज कृपा ॥ ब्रह्मानंद

---

१ फळाची इच्छा न धरितां. २ गूढ. ३ दुःख. ४ आपल्याचे तेजानें प्रकाशणारा.

सोपा केला मज ॥ ३३ ॥ केला मजवर उपकार गुरूनें ॥ तयासी उत्तीर्ण काय होऊं ॥ ३४ ॥ काय होऊं उतराई गुरुराया ॥ मस्तक हा पायां सदा असो ॥ ३५ ॥ सदा असो माझे अंतरीं वसती ॥ अखंड प्रेम प्रीति गुरुरूपीं ॥ ३६ ॥ गुरुरूपीं मज आत्यंतिक सुख ॥ अवलोकीं मुख सर्वकाळ ॥ ३७ ॥ सर्वकाळ मुखीं सद्गुरूचें नाम ॥ आणिक तें काम नाहीं मज ॥ ३८ ॥ नाहीं मज प्रिय सद्गुरुवांचूनी ॥ दृढनिश्चय मनीं केला असे ॥ ३९ ॥ केला असे प्राणसखा सद्गुरुराजा ॥ मन त्याची पूजा सदा करी ॥ ४० ॥ सदा करी मन सद्गुरुअर्चन ॥ तेणें समाधान होय त्यासी ॥ ४१ ॥ होय त्यासी सुख मुखें वर्णवेना ॥ षट्विध प्रमाणां लाग नाहीं ॥ ४२ ॥ लाग नाहीं जेथें अग्नि चंद्र सूर्या ॥ कारण त्या कार्या नाश जेथें ॥ ४३ ॥ नाश जेथें असे सकळ ब्रह्मांडा ॥ त्या सुखा अखंडा काय वानूं ॥ ४४ ॥ काय वानूं जेथें श्रुति मौनावल्या ॥ प्रमा[२] त्या पावल्या लया जेथें ॥ ४५ ॥ लय जेथें असे सर्व कल्पनांचा ॥ तेथें इंद्रियांचा काय पाड ॥ ४६ ॥ काय पाड असे अंतर इंद्रियां ॥ चारी[३] देह वाया झाले जेथें ॥ ४७ ॥ झाले जेथें लीन मन इंद्रिय प्राण ॥ त्या सुखा वर्णन कैसें होय ॥ ४८ ॥ कैसें होय वक्ता वाच्य आणि वचन ॥ त्रिपुटी हे क्षीण जया ठायीं ॥ ४९ ॥ जया ठायीं वसती तेहतीस कोटी देव ॥ तें सुख वैभव काय सांगू ॥ ५० ॥ काय सांगू मज मुखें वदवेना ॥ तेणें मीतूंपणा मावळला ॥ ५१ ॥ मावळला आतां जगदांधकार ॥ समूळ संसार पारुषला ॥ ५२ ॥ पारुषला मज सकळ द्वैतभाव ॥ दिसे भावाभाव ब्रह्मरूप ॥ ५३ ॥ ब्रह्मरूप जग व्यष्टि हें समष्टी ॥ भासे कृपादृष्टी सद्गुरूच्या ॥ ५४ ॥ सद्गुरूच्या कृपें हरपे जीव शिव ॥ ब्रह्म एकमेव अद्वितीय ॥ ५५ ॥ अद्वितीय ब्रह्म प्रत्यक्ष हें दिसे ॥ दृष्टि समरसें तदाकार ॥ ५६ ॥ तदाकार झाला सकळ हा देह ॥ राहे तो संदेह कैशापरी ॥ ५७ ॥ कैशापरी राहे द्वैताची भावना ॥ विपरीत भावना निवर्तल्या ॥ ५८ ॥ निवर्तल्या जेथें शास्त्रां-

---

१ उतराई. २ जाणण्याच्या शक्ति. ३ स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण. ४ खुंटका.

चीया मती ॥ मनादिक पंक्ति मावळली ॥ ५९ ॥ मावळली मज द्वैताद्वैत क्लृप्ति ॥ सुखें सहजस्थिति[1] भोगितसों ॥ ६० ॥ भोगितसों आह्मीं सुखें परमानंद ॥ कोटि हे आनंद वसती जेथें ॥ ६१ ॥ वसती जेथें सिद्ध महानुभाव संत ॥ असे तें अनंत ब्रह्मसुख ॥ ६२ ॥ ब्रह्मसुख झालें सहज जयासी ॥ तयाच्या भाग्यासी पार नाहीं ॥ ६३ ॥ पार नाहीं तया सुखा प्राप्त झाला ॥ संदेह तो झाला चिदानंद ॥ ६४ ॥ चिदानंद नित्य अज निरामय ॥ निर्विकार सबाह्य एकरूप ॥ ६६ ॥ एकरूप ब्रह्म उपाधिरहित ॥ तेथें तो वसत भाग्यवंत ॥६६॥ भाग्यवंत ऐसा असे गुरुदास ॥ देहासी उदास सर्वकाळ ॥ ६७ ॥ सर्वकाळीं करी सत्क्रिया भजन ॥ आणिक उपासन सद्गुरूचें ॥ ६८ ॥ सद्गुरूचें पादतीर्थ[2] सदा सेवी ॥ प्रपंचीं त्या गोवी कैशी होय ॥ ६९ ॥ कैशी होय गुरुभक्ता अधोगति[3] ॥ लागला सत्पथीं[4] गुरुकृपें ॥ ७० ॥ गुरुकृपें ज्यासी सत्पथ पावला ॥ जीव सुखावला ब्रह्मसुखें ॥ ७१ ॥ ब्रह्मसुखें झालों मी सदा संपन्न ॥ ब्रह्म परिपूर्ण अनुभविलें ॥ ७२ ॥ अनुभविलें ब्रह्म अंतर सबाह्य ॥ जग ब्रह्ममय झालें दिसे ॥ ७३ ॥ झालें दिसे ब्रह्म चतुर्दश लोक ॥ शुद्धाशुद्ध विवेक नाहीं जेथें॥७४॥ नाहीं जेथें द्वैताद्वैत जे उपाधि ॥ ते सुखी समाधि दासा झाली ॥ ७५ ॥ दासा झाली निद्रा शून्य सारूनियां ॥ वृत्ति पावलीया ब्रह्मसुखा ॥ ७६ ॥ ब्रह्मसुखा पावे ज्याचें अंतःकरण ॥ सर्व काळीं जाण ब्रह्मरूप ॥ ७७ ॥ ब्रह्मरूप झालें जयाचें तें अंग ॥ तया नित्य संग सज्जनाचा ॥ ७८ ॥ सज्जनाचा संग जयासी पैं होय ॥ तया उणें काय निज सुखा ॥ ७९ ॥ निजसुखा प्राप्त झाला संतसंगें ॥ तयाचीं सर्वांगें ब्रह्म झालीं ॥ ८० ॥ ब्रह्म झालें त्याचें काया वाचा मन ॥ साध्य आणि साधन सर्व ब्रह्म ॥ ८१ ॥ सर्व ब्रह्मावीण नाहीं अनुभव ॥ ऐसा त्याचा भाव एकविध ॥ ८२ ॥ एकविध भाव जयाचिया मनीं ॥ त्यासी चक्रपाणि[5] अंकिलासे ॥ ८३ ॥ अंकिलासे दैव तया सद्गुरुकृपें ॥ अहंकार पापें सोडियेलें ॥ ८४ ॥ सोडियलें त्यासी कामादि षड्विकारीं ॥ वस्ती त्या अंतरीं देवें केली

१ जीवन्मुक्ताचा अवस्था. २ पायांचें तीर्थ. ३ नरकवास. ४ चांगल्या मार्गास. ५ विष्णु.

॥८५॥ देवें केली त्यांसी आपुलीं अंकित॥ तोचि त्यांचें हित सत्य जाणे ॥८६॥ सत्य जाणे एक सद्गुरु दयाळ ॥ चरणकमळ त्याचें ध्यावें ॥ ८७ ॥ त्याचे ध्यावे चरण सदा सर्वकाळ ॥ प्रपंच सकळ सांडूनियां ॥ ८८ ॥ सांडूनियां ह्मणजे मिथ्या हा पहावा ॥ सद्गुरु करावा पाठीराखा ॥ ८९ ॥ पाठीराखा होय सद्गुरु जयासी ॥ कळिकाळ त्यासी बाधती ना ॥ ९० ॥ बाधती ना त्यासी मुक्ति रिद्धिसिद्धि[1] ॥ ज्याची सदा बुद्धि सद्गुरुपायीं ॥ ९१ ॥ सद्गुरुपायीं ज्याचें चित्त स्थिर झालें ॥ तयासी जोडलें मोक्षपद ॥ ९२ ॥ मोक्षपद त्याची इच्छा तें करीत ॥ भक्ताचे मनांत गुरुपद ॥ ९३ ॥ गुरुपदयोगें मुक्ति तुच्छ त्यासी ॥ त्याचिया मानसीं गुरु वसे ॥ ९४ ॥ गुरु वसे मनीं सदा सर्वकाळ ॥ तुटली हळहळ प्रपंचाची ॥ ९५ ॥ प्रपंचाची चिंता गुरुदासा नसे ॥ योगक्षेम असे गुरुहातीं ॥ ९६ ॥ गुरुहातीं असे सर्व त्याचें काम ॥ दासा मुखीं नाम गुरु गुरु ॥ ९७ ॥ गुरु गुरु जप अज्ञाननाशक ॥ भवसिंधुतारक गुरुनाम ॥ ९८ ॥ गुरुनामासम आणिक नाहीं मंत्र ॥ सांगताती शास्त्रें महानुभाव ॥ ९९ ॥ एका जनार्दन गुरुपदीं मस्तक ठेवुनि सम्यक ब्रह्म झाला ॥ १०० ॥

---

## दत्तात्रेयस्तुति.

१. दत्त दत्त वदतां वाचे ॥ होय जन्माचें सार्थक ॥ १ ॥ ऐसा जया नामीं वेधू ॥ तया परमानंदु हृदयीं ॥ २ ॥ दत्त आलिंगनीं समाधान ॥ तेणें नासे मीतूंपण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वेधू ॥ दत्त नामें लागला छंदू ॥ ४ ॥

२. दत्ता देतां आलिंगन ॥ कैसें होताहे अभिन्न ॥ १ ॥ स्वलीला स्वरूपता ॥ तिन्ही दावी अभिन्नता ॥ २ ॥ लाघवी श्रीदत्त ॥ देव भक्त स्वयें आपणचि होत ॥ ३ ॥ मीचि जनार्दन मीचि येका ॥ दत्त स्वरूपीं मीच देखा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं दत्त पुढें मागें ॥ सगुण निर्गुण रूपें लागला संगें ॥ ५ ॥

---

[1] साधकास पूर्णत्व यावयाचे वेळीं ऋद्धिसिद्धि प्राप्त होऊन त्याचें मन विकारयुक्त करितात.

३. जो जो जो जो रे निजाया ॥ हालविती अनसूया ॥ धृ० ॥ पालख पुरुषार्थ चौकोनी ॥ भक्ति नाडी गुंफोनी ॥ दोरी प्रेमाची लाऊनी ॥ शांति गाती गाणीं ॥ १ ॥ करितां उत्पत्ति शिणलासी ॥ विश्रांति आलासी निज रे ब्रह्मया तपलासी ॥ कमलोद्भव जालासी ॥ २ ॥ लक्ष्मीपति निज हो घनशामा ॥ सांडोनि वैकुंठधामा ॥ प्रतिपाळ करीं हो जीव नामा ॥ दर्शन दिधलें आह्मा ॥ ३ ॥ पार्वतीरमणा शिवा निज आतां ॥ संहारक जीवजंता ॥ निजरूप निमग्ना हो आदिनाथा ॥ एका जनार्दनीं दाता ॥ ४ ॥

४. अव्यक्त परब्रह्म न्हाणी पायावरी ॥ अभेद नरनारी मिळोनीयां ॥ १ ॥ पीतांबर पदरें पुशिला घननीळ ॥ निजविला निर्मळ पालखांत ॥ २ ॥ निंब कात बोळ त्रिगुण त्रिखुंडी ॥ प्रेमाचे आवडीं सेवी भय ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं दत्त पाळण्यांत घातिला ॥ हालविती त्याला अनसूया ॥ ४ ॥

५. धरी अवतार विश्व तारावया ॥ अत्रीची अनसूया गरोदर ॥ १ ॥ ऋतुकाळ हेमंत नक्षत्र रोहिणी ॥ शुक्ल पक्ष दिनीं पूर्ण तिथि ॥ २ ॥ तिथि पूर्णिमा मास मार्गशीर्ष ॥ गुरु तो वासर उत्सवकाळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूर्ण अवतार ॥ निर्गुण निराकार आकारलें ॥ ४ ॥

६. स्वानंदें आवडी दत्त पाहूं गेलों डोळा ॥ तंव चराचरें अवघे श्रीदत्तचि लीळा ॥ १ ॥ विस्मयो दाटला आतां पाहूं मी कैसें ॥ देखता देखणें अवघें दत्तचि दिसे ॥ २ ॥ असे आणि नसे हा तंव विकल्प जनांत ॥ जनीं जनार्दन निजरूपें दत ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं तेथें अद्वय नित्य ॥ सबाह्य अभ्यंतरीं दत्त नांदत ॥ ४ ॥

७. परमार्थी राखितां भावो नवल नव्हे पहा हो ॥ भक्त परिग्रहो चालवी दत्तदेवो ॥ १ ॥ कृपाळु श्रीदत्त कृपाळु श्रीदत्त ॥ अहर्निशीं स्वयें पाळित निज भक्त ॥ २ ॥ वत्सालागीं जैसी व्याली धेनु धावे ॥ निज भक्ताकारणें दत्त तैसा पावे ॥ ३ ॥ भक्तकीर्तनें तोषला दत्त संतोषला ॥ हरिजागरीं स्वयें सिद्ध प्रगटला ॥ ४ ॥ निजात्मस्थिति लीला मनी सुमनमाळा ॥ एका जनार्दनीं दत्त घाली गळां ॥ ५ ॥

---

१ पाळणा. २ नाभि कमळापासून उत्पन्न झालेला ब्रह्मदेव. ३ हालणारे व न हालणारे.

८. दत्त दत्त ह्मणे वाचे ॥ काळ पाय वंदी त्याचे ॥ १ ॥ दत्त चरणीं ठेवी वृत्ती ॥ होय वृत्तीची निवृत्ती ॥ २ ॥ दत्तरूप पाहे डोळा ॥ वंद्य होय कळिकाळा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दत्त ॥ हृदयीं वसे सदोदित ॥ ४ ॥

९. वेधोनी गेलें माझें मन ॥ हारपलें दुजेपण ॥ १ ॥ ऐसी ब्रह्ममूर्ति दत्त ॥ वोतलीसे आनंदभरित ॥ २ ॥ तयावीण ठाव ॥ रिता कोठें आहे वाव ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भरला ॥ सबाह्य अभ्यंतर व्यापिला ॥ ४ ॥

१०. आत्मज्ञान बिंबलें हृदयीं ॥ दत्त वोळखिला ठाईं ॥ १ ॥ पारिखे-पणा दूर गेला ॥ अवघा दत्तचि गमला ॥ २ ॥ नामें पावन चराचर ॥ तें दत्त नाम दोन अक्षरें ॥३॥ एकाजनार्दनीं छंदू ॥ दत्त नामें लागला वेधू॥४॥

११. माझी दत्त ती माउली ॥ प्रेम पान्हा पान्हावली ॥ १ ॥ कुर्वाळुनी लावी स्तनीं ॥ नोहे निष्ठुर क्रोध नाहीं मनीं ॥२॥ भक्तासी न विसंबे ॥ सदा वाट पाहे बिंबे ॥३॥ एकाजनार्दनीं निश्चित ॥ दत्त नामें पावन पतीत ॥४॥

१२. ह्मणतां दत्त दत्त ॥ दत्त करी देहातीत ॥ १ ॥ दत्तनामाचा निज छंद ॥ नासे प्रगटे परमानंद ॥ २ ॥ निजभाव समर्थ ॥ जेथें नाम तेथें दत्त ॥ ३ एका जनार्दनीं दत्त ॥ दत्त करी देहातीत ॥ ४ ॥

१३. दत्तात्रय नाम ज्याचे नित्य मुखीं ॥ तया सम सुखी नाहीं दुजा ॥ १ ॥ भावें दत्त दत्त ह्मणतसे वाचे ॥ कळिकाळ त्याचे पाय वंदी ॥ २ ॥ दत्ताचे पैं रूप ज्याचे वसे नेत्रीं ॥ ऐहिक्य[1] परत्रीं[2] तोचि सुखी ॥ ३ ॥ गुरुदत्तराया देई आलिंगन ॥ तयासी वंदन करिती सर्व ॥ ४ ॥ दत्त-रायाची जे करिताती यात्रा ॥ त्यांचेनि पवित्र होती तीर्थें ॥ ५ ॥ ज्याचे चित्तीं वसे गुरु दत्त ध्यान ॥ त्याचेनि पावन तिन्ही लोक ॥ ६ ॥ दत्ता-लागीं अर्पी तन मन धन ॥ परब्रह्म पूर्ण तोचि झाला ॥ ७ ॥ दत्तचरण-तीर्थ जो का नित्य सेवी ॥ उगवी तो गोवी प्रपंचासी ॥ ८ ॥ दत्तावरू-नीया कुरवंडी[3] काया ॥ तयाचिया पाया मोक्ष लागे ॥ ९ ॥ एका जनार्दनीं मुखीं दत्तनाम ॥ हरे भवश्रमें[4] क्षणामाजी ॥ १० ॥

---

१ परकाभाव. २ इहलोकीं. ३ ओवाळून टाकील. ४ संसारासंबंधाचे ताप.

१४. ऐशी जगाची माउली ॥ दत्त नामें व्यापुनी ठेली ॥ १ ॥ जावें जिकडे तिकडे दत्त ॥ ऐशी जया मति होत ॥ २॥ तया सांकडेंचि नाहीं॥ दत्त उभा सर्वां ठाईं ॥ ३ ॥ घात आघात निवारी ॥ भक्ता बाहे धरी करीं ॥ ४ ॥ ऐसी कृपाळु माउली ॥ एका जनार्दनें देखिली ॥ ५ ॥

१५. श्रीदत्त ऐसी वाचा पढे ॥ मोक्ष सायुज्यता जोडे ॥ १ ॥ ऐसी प्रचीत पाहा देहीं ॥ व्यापुनी असे देहीं विदेहीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं दत्त ॥ सबाह्य आनंद भरीत ॥ ३ ॥

१६. मनासी स्थिरता नामें दत्त वेध ॥ दुजा नाहीं छंद आणीक कांहीं ॥ १ ॥ ह्मणोनी संकल्प दृढ जाला पायीं ॥ दत्तावांचूनी ठाईं नोहे कांहीं ॥ २ ॥ पाहता पाहणें परतलें मन ॥ पाहण्याचे विंदान विसरलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं परब्रह्म पुतळा ॥ दत्त देखिला डोळा आत्मदृष्टीं ॥ ४ ॥

१७. प्राणीयासी मंत्र सोपा ॥ दत्त दत्त वाचें जपा ॥ १ ॥ आला नलगे साधन ॥ दत्त नामें घडे ज्ञान ॥ २ ॥ नलगे योगयाग पाहीं ॥ दत्तावांचून नेणे कांहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वेधलें मन ॥ मनचि झालें उन्मयें[२] ॥ ४ ॥

१८. त्रिगुणात्मक त्रिमूर्ती वेगळा ॥ पाहे तो सांवळा दत्तरायो ॥ १ ॥ मन माझें वेधलें दत्ताचे चरणीं ॥ नाहीं आतां मनीं दुजा छंद ॥ २ ॥ परात्पर पहावा हृदईं तैसा ध्यावा ॥ एकाजनार्दनीं सांठवावा दत्त मनीं ॥ ३ ॥

१९. लावण्य मनोहर प्रेमाचा पुतळा ॥ देखिलासे डोळा दत्तराव ॥ १ ॥ चरणीं घातली मिठीं प्रेम दुणावे पोटीं ॥ पाहतां हारपली दृष्टि दुजेपण ॥ २ ॥ मन माझें वेधलें परिपूर्ण भरलें ॥ एका जनार्दनीं सांठविलें हृदईं दत्त ॥ ३ ॥

२०. माझिया मनींचा फिटला संदेहो ॥ पाहुनीया देवो दत्तराव ॥ १ ॥ फिटला संकल्प तुटली वासना ॥ आन[३] नाहीं कल्पना दुजी कांहीं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं दत्त वेगळा जाण ॥ नोहे माझा प्राण क्षणभरी ॥ ३ ॥

२१. सर्व पर्वकाळें दत्त वदतां वाचें ॥ आणिक सायासाचें मूळ खुंटे ॥ १ ॥ ह्मणा दत्त दत्त ह्मणा दत्त दत्त ॥ ह्मणा दत्त दत्त वेळोवेळां ॥ २ ॥ काळ वेळ कांहीं नलगे तत्वतां ॥ नाम उच्चारितां दरुशन ॥ ३ ॥ भोळ्या

---

१ कौशल्य चतुराई. २ मनाचे धर्म नाहींसे झालेली स्थिति. ३ इतर. ४ पवित्रकाळ.

भाविकांसी जप मंत्रावळी ॥ दत्तनाम माउली सोपा जप ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नामाचा प्रताप ॥ निवारे भवताप दरुशनें ॥ ५ ॥

२२. त्रिगुणाविरहित नाम दत्तात्रय ॥ गातां वदतां होये आनंद चित्ता ॥ १ ॥ पालपटे मन संसारभावना ॥ अंतीं ते चरणा भेटी होये ॥ २ ॥ योगयाग कसवटी वाउगी रहाटी ॥ दत्त ह्मणतां होटीं सर्व जोडे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वदतां दत्त वाचे ॥ अनंत योगांचें पुण्य जोडे ॥ ४ ॥

२३. एकाएकी एकला काशीवासा गेला ॥ स्वलीला श्रीदत्त स्वयें प्रगटला ॥ १ ॥ दत्तदेव आला दत्तदेव आला ॥ स्वभाव सांडोनी भेटावया चला ॥ २ ॥ मुक्त मंडपा माझारीं निज नाम नगरीं ॥ दत्त प्रगटला कीर्तनामाझारीं ॥ ३ ॥ भेटणें भेटीउठी दत्ता जाली भेटी ॥ सांगणें ऐकणें दत्त होऊनीया उठी ॥ ४ कीर्तनीं आतौता नाम श्रीदत्त दत्त ॥ निज कीर्ति ऐकोनी डोले तत्त्वतां ॥ ५ ॥ जळा सबाह्य अंतरीं मनकर्णिका तीरीं दत्त स्नान करी आत्ममुद्रेवरी ॥ ६ ॥ दत्त जंगमीं स्थावरीं विश्वीं विश्व धरी ॥ तोची दत्त घरोघरीं नित्य भिक्षा करी ॥ ७ ॥ एका जनार्दनीं दत्त वचनें देख ॥ प्रपंच परमार्थ मीच चालवी एक ॥ ८ ॥

२४. ऑरतें आरती दत्त वोवाळूं जातां ॥ आरतीचें हरण दत्तें केलें तत्त्वतां ॥ १ ॥ आरती खुटली आतां ओवाळूं कैसें ॥ तरी निजभजनें निरंजनें होतसे ॥ २ ॥ आरतीचें आर्त पुरवी श्रीदत्त ॥ एका जनार्दनी सहज वोवाळीत ॥ ३ ॥

२५. तुमचा प्रसाद लाधला मस्तकीं ॥ श्रीदत्तराया तेणें जालों मी सुखी ॥ १ ॥ वाचे वेद नाम दत्त दत्त आवडी ॥ हीच माझी जोडी न करी दुजी ॥ २ ॥ पायांचा आठव द्यावा सर्वकाळ ॥ अखंड कल्लोल नामघोष ॥ ३ ॥ ह्मणे जनार्दन एकनाथा परियेसी ॥ ध्यान अहर्निशीं दत्तात्रय ॥ ४ ॥

२६. सद्गुरुरायाचे वंदावे चरण । ऐसे दयाघन विचारी तो ॥ १ ॥ दत्तात्रीचें रूप कैसें तें बा आहे । कशावरी राहे सांग दादा ॥ २ ॥ कोणे

---

१ बदलतें. २ परीक्षा. ३ ओठांनीं. ४ मध्यें. ५ इच्छाधरून. ६ मारब्धरहित.

ठायीं वस्ती कोणें ठायीं येणें ॥ कोणें ठायीं जन्मणें सांग बापा ॥ ३ ॥ एकनाथ ह्मणे दत्तात्री कृपेनें ॥ केला असे प्रश्न तुह्मालागी ॥ ४ ॥

२७. ॐ अनंत निर्गुण सर्वां ठायीं पूर्ण ॥ न करी निर्वाणि दासालागीं ॥ १ ॥ हाकेबरोबरी धांवोनी सत्वरी ॥ भक्तालागीं तारी गुरुनाथ ॥ २ ॥ सुंदर तें ध्यान वसे औदुबरीं ॥ व्याघ्रचर्मधारी शोभतसे ॥ ३ ॥ काषाय अंबरं दंड कमंडलू ॥ डमरु त्रिशूळ शंख चक्र ॥ ४ ॥ किरीट कुंडलें रुद्राक्षाच्या माळा ॥ वैजयंती गळां हार रुळे ॥ ५ ॥ सूर्य चंद्र नेत्र शेष फणी छत्र ॥ पीतांबर वस्त्र परिधान ॥ ६ ॥ गुरुचरणीं सर्व तीर्थांची मिराशी ॥ ह्मणोनी जगासी उद्धरिती ॥ ७ ॥ जनार्दन ह्मणे नलगे ब्रह्मज्ञान ॥ गुरुचरणीं मन राहो सदा ॥ ८ ॥

२८. दत्तात्रीचें नाम घेतां वेळोवेळां ॥ जन्म त्याचा झाला कोणे दिवशीं ॥ १ ॥ आकार हा त्याचा कोणे दिवशीं झाला ॥ सांग बा मजला गुरुपुत्रा ॥ २ ॥ कोणते दिवशीं घातलें आसन ॥ सांग मजप्रती सर्व आतां ॥ ३ ॥ एकनाथ ह्मणे निरसूं लागलें ॥ रूप तें ओळखिलें दत्तात्रीचें ॥ ४ ॥

२९. धन्य कृष्णातीर धन्य औदुंबर ॥ जेथें गुरुवर वसतसे ॥ १ ॥ धन्य तेची नर येती जे यात्रेसी ॥ दर्शन मात्रें त्यांसी मोक्षजोडे ॥ २ ॥ अनंत जन्मांचीं पातकें संचित ॥ नुरती किंचित तीर्थ घेतां ॥ ३ ॥ वाचितां चरित्र सद्गुरु स्वामींचें ॥ निर्मूलन भवाचें सत्य होय ॥ ४ ॥ नामस्मरणें ज्याच्या सद्गुरुची होणें ॥ व्यर्थ चिंता वाहणें संसाराची ॥ ५ ॥ गुरु गीतीं गावा भावें चित्तीं ध्यावा ॥ सगुण पहावा डोळे भरी ॥ ६ ॥ जनार्दन ह्मणे तीथें त्याचे पासीं ॥ चारी मुक्ती दासी होती त्याच्या ॥ ७ ॥

३०. ज्योतीमाजी ज्योत कैशी हारपली ॥ कोठें सामावेली सांग बापा ॥ १ ॥ सोहं मंत्र बीज काय तो बा केला ॥ सांगसी उतारा मजलागीं ॥ २ ॥ ह्मणुनियां आतां समाधान केलें ॥ सांग बा वहिलें हितगुज ॥ ३ ॥ भूमीवरी पाय कोणता टाकावा ॥ कोण पंथ दावा मज लागीं ॥ ४ ॥ साडे

१ अंत पाहाणें. २ भगव्या रंगाचें. ३ वस्त्र. ४ समूळनाश. ५ भरून राहिली.

बारा पंथ पाहें शोधूनियां ॥ सांग त्याची खुणा गुरुपुत्रा ॥ ५ ॥ एकनाथ ह्मणे सांग झडकरी ॥ उशीर क्षणभरी लावूं नका ॥ ६ ॥

३२. दत्तात्रीची मूर्ति स्वरूपीं पाहिली । नामें हंकारली गुप्तरूप ॥ १ ॥ आकार तो त्याचा कोणे ठायीं झाला ॥ पिंडातून वेगळा दत्तात्री तो ॥ २॥ कोण रूप त्याचें सांग तूं अनंता ॥ गुरुकृपें आतां सांग मज ॥३॥ एकनाथ ह्मणे सातर्क्य शोधावें ॥ रूप ओळखावें दत्तात्रीचें ॥ ४ ॥

३१. साडे बारा पंथ ऐका त्यांचीं नांवें ॥ सांगतों मी भावें गुरुपुत्रा ॥ १ ॥ तीर क्षेत्र वन अरण्य गिरि जाण ॥ प्रताप समान शाश्वता ॥ २ ॥ गिरि पुरी भारथी संन्यासी वा नाथ ॥ अर्धा तो बा पंथ निरंजनीं ॥ ३ ॥ मिळूनियां पंथ साडे बारा जाण ॥ सांगितली खूण गुरुपुत्रा ॥ ४ ॥ एकनाथें सांगितली खूण ॥ गेलों मी शरण सद्गुरूला ॥ ५ ॥

३३. खुंटलासे शब्द बोलतां आनंद ॥ सर्व ब्रह्मानंद कोंदाटला ॥ १ ॥ तें हें दत्तनाम आवडी आदरें ॥ उच्चारी सोपारें सर्वकाळ ॥ २ ॥ कलिमाजी सोपें दत्तनाम घेतां ॥ संसारी वार्ता उरी नुरें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं लागलासे छंद ॥ दत्तनामें आनंद सर्वकाळ ॥ ४ ॥

३४. दत्त दत्त वरद पैं दत्त ॥ दत्तीं दत्त चित्त चित्त सुचित्त ॥ १ ॥ श्रीदत्त श्रीदत्त श्रीदत्त देवा ॥ हाचि छंद जीवीं लागला जीवा ॥ धृ० ॥ अभय दत्तें दत्त निर्भय दत्त ॥ भवभय दत्त शिवों नेदी ॥ २ ॥ जीवीं जीव दत्त शिवीं शीव दत्त ॥ एका जनार्दनी अद्वय दत्त ॥ ३ ॥

३५. दत्तगुरु दत्त गुरु दत्तात्रय गुरु ॥ धृ० ॥ शंख चक्र गदाधरा ॥ दिगांबरा जटाधरा ॥१॥ आदिनाथ दिनानाथ ॥ ब्रह्मरूप दत्त गुरु ॥ २ ॥ कौपीन दंडधरा ॥ कमलदलाक्ष[2] कमलाकरा ॥ ३ ॥ संचित्त सुखा अखिल सार ॥ ब्रह्मरूप निराकार ॥ ४ ॥ निरंजन निराभास ॥ निर्विकल्प चित्प्रकाश ॥ ५ ॥ एका जनार्दनीं जाण ॥ सर्वांघटी परिपूर्ण ॥ ६ ॥

३६. दत्त शिष्य परंपरा ॥ सांगेन मी अवधारा[3] ॥ १ ॥ कार्तवीर्य दुसरा यदू ॥ जनीं जनार्दन शुद्ध ॥ धृ० ॥ पूर्वी उपदेशिले दोन्ही ॥ तिसरा

१ विचारपूर्वक. २ कमलपत्राप्रमाणें नेत्र असलेला. ३ लक्ष्य ठेवा.

जनार्दन जनीं ॥ २ ॥ दत्तीं भेटला प्रल्हादू ॥ तेणें ओसंडला आल्हादू ॥ ३ ॥ दत्तें उद्धरीले किते ॥ हे तंव न करवे निरुतें ॥ ४ ॥ एका जनार्दनें जनीं ॥ भेटी दिधली पांचजणी ॥ ५ ॥

३७. पंचस्वरमाहि दत्त मैरी दिठो ॥ अब जब तब फिर देखु तो मूलपीठें बैंठो ॥ १ ॥ दत्त गुसाई चल चलिरी देख न जाई ॥ धृ० ॥ एका जनार्दनके रे संग संग वसें॥ उसके बचनो दत्त जाहां ताहांदिसे ॥ २ ॥

३८. देव तोही दत्त भक्त तोही दत्त ॥ येणेंचि भजनें दत्त संतोषत ॥ १ ॥ श्रीदत्त श्रीदत्त देवा ॥ दुर्जनविन घेतसे सेवा ॥ धृ० ॥ सिद्धि सिद्ध दत्त बुद्धि बुद्धि दत्त ॥ बोधें बोध दत्त बोधवितू ॥ २ ॥ गति परम गती दत्त विरक्ती ॥ सहज सिद्धस्थिति नांदतुसे ॥ ३ ॥ भुक्ति तेही दत्त मुक्ति तेही दत्त ॥ युक्ति तेही दत्त देतु असे ॥ ४ ॥ आह्मा योग तोही दत्त ॥ भोग तोही दत्त ॥ संग तोही दत्त सांगाती बा ॥ ५ ॥ गुरुचाही गुरु दत्त परम गुरू ॥ जनार्दनीं दत्त योग्यां योगेश्वरू ॥ ६ ॥ आह्मा देहीं देह दत्त विदेह तोही दत्त ॥ एका जनार्दनें दत्तें विनिर्मुक्त ॥ ७ ॥

३९.[2] ब्रह्मगिरी वरी ॥ जन्म गोदावरी ॥ ओघ चिदंबर औदुबरीं ॥ भजन गंगाद्वारीं ॥ पूर्ण निरंतरीं ॥ गौतमाळा सार पूर्ण भरितें ॥धृ०॥ जय गोदावरी ॥ गोग्रहण ग्रहण ॥ उद्धरी मज्जन पापतापदैन्य उरों नेदी ॥ १ ॥ वैराग्य कुशावर्तीं उद्धरी लवलाहे ॥ गोवर्धनीं वाहे चित्स्वरूपें ॥ नासिका नासिक तेंचि निर्नासीक ॥ जनस्थानीं देख जन उद्धरी ॥ २ ॥ अरुणा वरुणा दोन्ही भक्ति विरक्ती ॥ शांति सरस्वती पूर्वमुखें ॥ शिवाचें कपाळ फिटलें तत्काळ ॥ सुंदरें तो काळ साधियेला ॥ ३ ॥ दोघें सम दृष्टी वसती दोहीं तटी ॥ सुंदरी पैं दृष्टी कपालेशा ॥ कपालेश्वरावरी सुंदर तोही कुळा उद्धरी दोघे जन ॥ ४ ॥ विद्या अविद्या दोन्ही कद्रु विनिता होऊनि ॥ आलिया धांवोनि भेटावया ॥ देखता पर तीर गेला सवतीमत्सर ॥ समरसें निजसार पावलिया ॥ ५ ॥ विद्या अविद्या निजसार ॥ पावल्या साचार ॥ साक्ष मध्यमेश्वर दोहीमध्यें ॥ पुण्याची निज शोभा ॥

---

१ दुसऱ्या खेरीज. २ या अभंगांत प्रसिद्ध प्रसिद्ध तीर्थक्षेत्रांचें मार्मिक वर्णन आलें आहे.

आली पुण्य स्तंभा ॥ जीव शिव पद शोभा सांडुनी ॥ ६ ॥ पश्चिम वाहिनी ॥ अमृतसंजीवनी ॥ दुःखनिमज्जनी उरोंनेदी ॥ प्रपंचीचें पांच निष्प्रपंच ॥ कचाचि कचकच उपशमली ॥ ७ ॥ साठी संवत्सर नारदासी पुत्र ॥ हे कृष्णचरित्र अघमर्षणी ॥ नारदी संगम नारदाचा श्रम ॥ सांडुनी परम शुद्ध केला ॥ ८ ॥ प्रवरा संगम परमामृत परम ॥ स्नानमात्रें[१] श्रम उरों नेदी ॥ रामह्रद अगाध दर्शनें आल्हाद ॥ निमज्जनीं बोध निजरूपाचा ॥ ९ ॥ येळा वृद्धा दोही तिरी ॥ मध्यें गोदावरी ॥ त्रिवेणी खरी प्रतिष्ठानी ॥ षट्काळ दर्शन ॥ करितां शुद्ध स्नान ॥ गमनागमन[२] पारूषलें ॥ १० ॥ प्रतिष्ठानी ख्याति ॥ तीर्थ भोगावती ॥ तेही तुझी संगती वांच्छी तसे ॥ तुझीये संगती भोगी नित्य मुक्ती ॥ प्रतिष्ठानि· वस्ती परमार्थीया ॥ ११ ॥ श्रीदत्त स्नान करी शुद्ध गोदावरी ॥ जड जीव उद्धरी आत्मतीर्थी ॥ पंचाळेश्वर तोचि पंचवक्र ॥ हरीहर एकत्र वसती ॥ १२ ॥ पापें दंडीं. खरी ॥ पाप दंडराजपुरी ॥ महा दोषा उरी उरों नेदी ॥ अब्जकीचें आप निरसनें[३]निजपाप ॥ त्रिगुण त्रिविध ताप ॥ उरों नेदी ॥ १३ ॥ बाणेचा संगम ॥ उडवी वर्णाश्रम ॥ वंजरा संगम मोहनासिनी ॥ सुधेचा संगम ॥ शुद्ध मनोधर्म ॥ दोही कुळीं परब्रह्म ॥ कोंदाटलें ॥ १४ ॥ कुश तर्पण तीरी ॥ निकट रामगिरी ॥ काळेश्वर करी निजमंथन ॥ मंथोनि कळीकाळ ॥ खंडली खळवळ ॥ चैतन्य चिज्जळ प्रवाहत ॥ १५ ॥ सप्त धातु सांगा ॥ सप्तमुखी गंगा ॥ मीनली लागवेगा ॥ सुखसागरीं ॥ एका जनार्दन संग चित्सागर ॥ साक्ष रामेश्वर हृदयलिंग ॥ १६ ॥

## उपास्यदैवतपर अभंग.

१. नलगतां क्षण ॥ करी आपुल्यासमान ॥ १ ॥ तो हा पंढरीचा राणा ॥ बहु आठवतो मना ॥ २ ॥ न पाहे यातीकुळ ॥ शुद्ध अथवा चांडाळ ॥ ३ ॥ दीनाचा दयाळ ॥ बहु दासांची कळवळ ॥ ४ ॥ एकाजनार्दनी भावें ॥ त्यासी एकवेळ गावें ॥ ५ ॥

१ स्नान केलें असतां. २ जन्ममृत्यूचे फेरे. ३ आपलें पाप नष्ट करणारें.

२. कशास जावें दूर ॥ माझें येथेंचि पंढरपूर ॥ धृ० ॥ आणुरेणु-व्यापक विठ्ठल अवघा ॥ काय ह्मणावा दूर ॥ १ ॥ भक्तिभीमातीर भाव पुंडलीक ॥ आत्मा विठ्ठल धूर ॥ २॥ विठ्ठल स्मरणीं विठ्ठल जाला ॥ नाहीं, नाहीं, मना हुरहूर ॥ ३ ॥ एका जनार्दन निजगुरू बोधें ॥ भलते ठाईं निसूर[1] ॥ ४ ॥

३. कृष्ण पावोनि झाले आंन ॥ शेखीं बुडविलें संध्यास्नान ॥ १ ॥ कृष्ण ह्मणो नये सोपारा ॥ तेणें बुडविलें सकळ व्यापारा ॥ धृ० ॥ जप तप राहिलें अनुष्ठान ॥ शेखीं बुडविलें ध्येय ध्याता ध्यान ॥ २ ॥ सच्चिदानंद आनंद ॥ तोही बुडविला निजबोध ॥ ३ ॥ माझें हरपलें मीपण ॥ देहीं बुडविलें देहपण ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं भावें ॥ क्रिया कर्म बुडालें स्वभावें ॥ ५ ॥

४. विठ्ठल निर्गुण निर्विकार ॥ विठ्ठल सगुण संताकार ॥ अवतरला मनोहर ॥ परात्पर सांवळा ॥ १ ॥ विठ्ठल संताचें रूपडें ॥ प्रत्यक्ष पाहतां नेत्रांपुढें ॥ त्यासी न जाणती मूढें ॥ विषयजाळीं[2] गुंतलीं ॥ धृ० ॥ मुक्ताबाई सकळ तनू ॥ दिव्य दीप्ति तो हा भानू ॥ प्रभावटेश्वरु जगजीवनू ॥ अति लावण्यु शोभतसे ॥ २ ॥ ज्ञानदेव मुखकमळ ॥ निवृत्ति देव मुगुट झळाळ[3] ॥ सोपानदेव तो निढळ ॥ आदिपुरुष रायाचे ॥ ३ ॥ मुकुंदराज परमावधारीं ॥ श्रवण[4] देवाचे निर्धारीं ॥ नेत्र चांगा विसोबा खेचरी ॥ सोहं प्रकाश वरी झळकतसे ॥ ४ ॥ वडवाळ सिद्ध नागेश नासापुट ॥ नामा कबीर दोन्ही होंट ॥ जिव्हा महा मुद्गलभट ॥ किंवा घांट गर्जतसे ॥ ५ ॥ बाहु दंडा चोखामेळ ॥ बहिरा पिसा वक्षस्थळ ॥ जनमैत्र नागा कंठ नाळ ॥ जोगा माळ प्रेमाची ॥ ६ ॥ हृदयारविंद योगि जन ॥ अच्युत सारंग दोन्हीं स्तन ॥ उदर तो रेणुकानंदन ॥ नाभी नरसिंहभारती ॥ ७ ॥ पाटक नामा कटी प्रदेश ॥ सुधा पीतांबर सुरस ॥ चरणाविंद रोहिदास ॥ आणि सुरदास सांवता ॥ ८ ॥ नारा महादा गोविंदा विठा ॥ ह्या देवाच्या क्षुद्र घंटा ॥ जोति तोडर गोरा सेना सजना ॥ तोरड एका जनार्दन ॥ ९ ॥

---

१ चिंतारहित. २ शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध यांच्या उपभोगांत. ३ तेजस्वी. ४ कान.

# जनार्दनस्वामींचा बोध.

१. एकविध भाव सर्वांठायीं धरी ॥ द्वैताची ती उरी उरवूं नको ॥ १ ॥ हाचि अनुभव सुगम सोपारा ॥ययाची निर्धारा तरले बहू ॥ २ ॥ ध्रुव उपमन्यु बिभीषण नारद ॥ गाई गोप वृंद तरते झाले ॥ ३ ॥ ह्मणे जनार्दन एकनाथा निजखूण ॥ विटेवरी समचरण पाहे दृष्टी ॥ ४ ॥

२. शरण गेलिया संतांसी ॥ तेणें चुकती चौऱ्यायसी ॥ १ ॥ द्यावें संतां आलिंगन ॥ तेणें तुटे भवबंधन ॥ २ ॥ वंदितां चरणरज ॥ पावन देह होती सहज ॥ ३ ॥ घालितां चरणीं मिठी ॥ लाभ होय उठाउंठी ॥ ४ ॥ प्रेमें दर्शन घेतां ॥ मोक्ष सायुज्य ये हातां ॥ ५ ॥ ह्मणे जनार्दन ॥ एका लाधलीसे खूण ॥ ६ ॥

३. संत देवाचा लाडका ॥ देव तेणें केला बोडका ॥ १ ॥ अर्थ पाहतां सखोल असे ॥ बोडका देव पंढरीं वसे ॥ २ ॥ संत लाडका देव बोडका ॥ ह्मणे जनार्दन लाडका एकां ॥ ३ ॥

४. जप जाप्य मंत्र नको यंत्र तंत्र ॥ वर्णिजे जगत्र[2] रामनाम ॥ १ ॥ पाउला पांउलीं घडतसे यज्ञ ॥ तेणें सर्व पुण्य हातीं जोडे ॥ २ ॥ संताची संगति नामाचा निजध्यास ॥ तेणें जोडे सौरस[3] हातीं मग ॥ ३ ॥ सावधान ह्मणे जनार्दन ॥ एकनाथा पूर्ण होईल धन्य ॥ ४ ॥

५. बोडक्या लाडक्या जाली भेटी ॥ गेलें दैन्य उठाउठी ॥ १ ॥ उभयतांची येकचि राशी ॥ बोडके लाडक्यासी संतोषी ॥ २ ॥ बोडका देव लाडका भक्त ॥ उभयलोकीं त्यांची मात ॥ ३ ॥ ह्मणे जनार्दन समजले ॥ एकनाथीं रंगले हृदयामाजीं ॥ ४ ॥

६. आणिक या सृष्टि साधन पैं नाहीं ॥ घेई पां लवलाहीं नाम वाचे ॥ १ ॥ उभा दिगंबर कटीं ठेउनी कर ॥ शोभतसे तीर चंद्रभागा ॥ २ ॥ पुंडलीकें निज साधिलें साधन ॥ तें तूं हृदयीं जाण धरी भावें ॥ ३ ॥ ह्मणे जनार्दन एकनाथ हृदयीं ॥ विठ्ठल मंत्र ध्यायीं[4] सर्वकाळ ॥ ४ ॥

---

१ जलदीनें. २ तिन्ही जगांमध्यें. ३ आत्म पदार्थ. ४ ध्यान कर.

७. संकल्प विकल्प या वरी घाली शून्य ॥ मन करीं निमग्न हरिपायीं ॥ १ ॥ उपासना दृढ संताचे चरणीं ॥ तोचि पैं निर्वाणीं तारक तुज॥२॥ पडतां जड भारी संत सहाकारी ॥ सर्व भावें हरि तेचि होती ॥ ३ ॥ ह्मणे जनार्दन एकनाथा न विसंबे ॥ सोपा मार्ग ऐकें सर्वभावें ॥ ४ ॥

८. तीर्थ पर्यटन[1] कासया करणें ॥ मन शुद्ध करणें आधीं बापा ॥ १ ॥ तीर्थां जाउनी काय मन शुद्ध होई ॥ निवांतची ठाईं बैसें बापा ॥ २ ॥ मन शुद्ध जालिया गृहींच देव असे ॥ भाविकासी दिसे बैसल्याठाईं ॥३॥ ह्मणे जनार्दन बोध हाचि एकनाथा ॥ याहुनी सर्वथा श्रेष्ठ नाहीं ॥ ४ ॥

९. विधि[2] निषेध[3] थारा पसारा ॥ न जाय तूं सैरा आणिके पंथा ॥ १ ॥ पंथ सोपा जाणा पंढरी पावन ॥ याहुनीया आन[4] वंद्य कोण ॥ २ ॥ सर्वोत्तम तीर्थ देव आणि नाम ॥ पुरती सर्व काम विठ्ठलपायीं ॥ ३ ॥ ह्मणे जनार्दन ऐकें एकनाथा ॥ शरण तत्वता संतां रिघें ॥ ४ ॥

१०. न करी आळस हरिचिया भजनीं ॥ तेणें तुज निर्वाणीं सुख होय ॥ १ ॥ नाम गाय सोपें नाम गाय सोपें ॥ कळीकाळाचें मापें रितें होय ॥ २ ॥ संसार पसर करिसी तळमळ ॥ कां रे घननीळ नाठवीसी ॥ ३ ॥ पुत्र दारा धन कवण हें कवणाचें ॥ आहे तोंवरी माझें माझें ह्मणती ॥४॥ लटिका प्रपंच सर्व नाशिवंत ॥ एक हें शाश्वत हरिनाम ॥ ५ ॥ ह्मणे जनार्दन एकनाथा घेईं ॥ प्रेमसुख पाहीं पावसील ॥ ६ ॥

११. देह शुद्ध करुनी भजनीं भजावें ॥ आणिकाचे[5] नाठवावे दोषगुण ॥ १ ॥ साधनें समाधि नको पां उपाधी ॥ सर्व समबुद्धि करीं मन ॥ २ ॥ ह्मणे जनार्दन घेईं अनुताप ॥ सांडी पां संकल्प एकनाथा ॥ ३ ॥

१२. नको गुंतूं लटिक्या प्रपंचासी बापा ॥ मार्ग आहे सोपा पंढरीचा ॥ १ ॥ नलगे पुसावें आटाआटी कांहीं ॥ आणिके प्रवाहीं गुंतूं नको ॥२॥ भांबावल्या परी जन जाले मूढ ॥ विसरले दृढ विठोबासी ॥ ३ ॥ ह्मणे जनार्दन एकनाथा निकें ॥ साधी तूं कौतुकें हेंचि वर्म ॥ ४ ॥

---

१ फिरणें. २ कर्मं करण्याविषयीं आज्ञा. ३ कर्मांविषयीं मनाई. ४ इतर. ५ इतरांचे.

# विठ्ठलपर अभंग.

१. समचरणीं उभा चैतन्याचा गाभा ॥ त्रैलोक्याची शोभा पांडुरंग ॥ १ ॥ भक्ताचें जीवन साधकाचें साधन ॥ सुखाचें निधान पांडुरंग ॥ २ ॥ मुक्तिकल्पद्रुम महाफळ उत्तम ॥ गोपिकांचा काम[1] पांडुरंग ॥ ३ ॥ एकाएकीं विनटला तो सदा संचला ॥ एकाजनार्दनीं भेटला पांडुरंग ॥ ४॥

२. आह्मा नादीं विठ्ठलू छंदीं विठ्ठलू ॥ हृत्पदीं[2] विठ्ठलु मिळतसे ॥ १ ॥ आह्मा धातु[3] विठ्ठलु मातु विठ्ठलू ॥ गातु विठ्ठलु आनंदें ॥ २ ॥ आह्मा राग विठ्ठलु रंग विठ्ठलू ॥ संग विठ्ठलु वैष्णवांचा ॥ ३ ॥ आह्मा ताल विठ्ठलू मेळ विठ्ठलु ॥ कल्लोळ विठ्ठलु कीर्तनें ॥ ४ ॥ आह्मा श्रुति विठ्ठलु श्रोता विठ्ठलू ॥ वक्ता विठ्ठलु वदनीं ॥ ५ ॥ आह्मा मनीं विठ्ठलु ध्यानीं विठ्ठलू ॥ एकाजनार्दनीं अवघा विठ्ठलु ॥ ६ ॥

३. माझें माहेर पंढरी ॥ आहे भीवरीचे तीरीं ॥ १ ॥ बाप आणिआई ॥ माझीं विठ्ठल रखुमाई ॥ २ ॥ पुंडलीक बंधु आहे ॥ त्यांची ख्याती सांगूं काय ॥ ३ ॥ माझी बहिण चंद्रभागा ॥ करीतसे पापभंगा[4] ॥ ४ ॥ एका जनार्दना शरण ॥ करी माहेरींची आठवण ॥ ५ ॥

४. जेथें जावें तेथें देवची सांगातें ॥ ऐसें केलें नाथें पंढरीच्या ॥ १ ॥ अंतरीं बाहेरीं एकमय झालें ॥ अवघें कोंदाटलें परब्रह्म ॥ २ ॥ शब्द तेथें झाला समूळची वाव ॥ गेला देहभाव हारपोनी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐशी झाली वृत्ती ॥ वृत्तीची निवृत्ति चिदानंदीं ॥ ४ ॥

५. विठ्ठलें लाविलें पिसें ॥ जिकडे पाहे तिकडे दिसे ॥ १ ॥ समचरणाची शोभा ॥ अवघ्या जगीं विठ्ठल उभा ॥ २ ॥ पाहणें पाहतां माझारीं ॥ पाहाते गेले पाहाण्यावरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एक ॥ विठ्ठल अवलोकीं लोक ॥ ४ ॥

---

१ इच्छा. २ हृदयरूपस्थानांत. ३ उत्पन्न करणारा. ४ पापांचा नाश.

६. जें आसनीं बैसल्या आहे ॥ तेंचि मार्गीं जातां पाहे ॥ विठ्ठल सांगातीं करुनी ॥ अवघा पंढरीये जाये ॥ १ ॥ ह्मणोनी चाली रे भाई वेगीं पंढरपुरा उठी ॥ पाउला पाउल विठ्ठल ॥ पाहात जाऊं दिठी ॥ धृ० ॥ जरी धरीशिल शुद्ध भावो ॥ तुजसमोर आहे देवो ॥ तो तंव सबाह्य धरुनी ॥ अवघा पंढरीये जातो ॥ २ ॥ ज्या देवाचे यात्रे जाणें ॥ देवदर्शन घेऊनी येणें ॥ देव माघारा सांडीतां ॥ तुझें मनची देव ह्मणे ॥ ३ ॥ जो भावेंसी यात्रा करी ॥ विठ्ठल आहे त्या भीतरीं ॥ त्याचेनी नमनें आलिंगनें ॥ तिथें उद्धरती निर्धारी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं निजे ॥ नाचत आनंदाची भोजें ॥ यात्रे जातां होय आल्हादू ॥ घोळतू वैष्णवाचेनि रजें ॥ ५ ॥

७. शब्दा आदि मध्य अंतीं ॥ उच्चारितां व्यक्ताव्यक्तीं ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल जिव्हारीं ॥ तरी मुक्ति होय कामारी[1] ॥ धृ० ॥ विश्वीं उघडा विठ्ठल पाहे ॥ मुक्त ह्मणतां भय काय ॥ २ ॥ एका जनार्दनु ठसा ॥ विठ्ठल पाहे शब्दासरिसा ॥ ३ ॥

८. विठ्ठला हृदयकमळींचा आमोद[2] ॥ तो सेवितां जीव झाला षट्पद[3] ॥ १ ॥ कांहीं केलिया निवडीतां न निवडे ॥ जीवीं जीव गुंतला वोंडेंकोडें ॥ २ ॥ लवणाची करूनिया घागरी ॥ भरूनि काढितां विरली ते सागरीं ॥ ३ ॥ एका एक गेलिया नुरे कांहीं ॥ एका जनार्दन देह विदेही ॥ ४ ॥

९. सारुनी दृश्य देखतां जालीसे ऐक्यता ॥ पाहे कृष्णनाथा पंढरीये ॥ १ ॥ कर ठेउनी कटीं बुंथी[4] वाळुवंटी ॥ वैजयंती कंठीं आर्ती माझी ॥ २ ॥ एकाजनार्दना शरण त्याची कृपा पूर्ण ॥ पाहातां पाहतां मन हारपलें ॥ ३ ॥

१०. अभंग विठ्ठल परि मना सांडी विषय खोडी ॥ लावी विठ्ठलेसी गोडी ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल सांवळा ॥ पाहे उघडा डोळां ॥ आणीक नलगे साधन ॥ ऐकिलें मनचि करी उन्मन ॥ २ ॥ एका जनार्दना शरण ॥ मनची होय विठ्ठल पूर्ण ॥ ३ ॥

---

१ काम करणारी दासी. २ सुवास. ३ भ्रमर. ४ निश्चयपूर्वक. ५ पांघरूण.

११. माझा दीनानाथ दीनबंधु हरी ॥ नांदे भीमातीरीं पंढरिये ॥ १ ॥ विटे नीट उभा समचरणें साजरीं ॥ पावलें गोजरीं सकुमार ॥ २ ॥ वैजयंतिमाळा शोभतसे गळां ॥ कासेसी पिंवळा पीतांबर ॥ ३ ॥ ऊर्ध्व पुंड्र भाळीं कुंडलें गोमटीं ॥ चंदनाची उटी सर्वांगासी ॥ ४ ॥ शीरीं टोप साजे रत्नाचा साजिरा ॥ वरी शोभे तुरा मोतीयांचा ॥ ५ ॥ शोभे दंत-पंक्ति हिरियांच्या ज्योती[1] ॥ ध्याई तयाप्रती एकाएकीं ॥ ६ ॥

१२ माझ्या वडिलांचें दैवत ॥ कृपाळु हा पंढरीनाथ ॥ १ ॥ पंढरीसी जाऊं चला ॥ भेटूं रखुमाई विठ्ठला ॥ २ ॥ पुंडलीक बरवें केलें ॥ कैसें भक्तीनें गोविलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नीट ॥ पाईं जडलीसे वीट ॥ ४ ॥

१३. कृष्णचंदन आणिलें ॥ सकळ वेधिलें परिमळें[2] ॥ १ ॥ तेणें फुटती अंकुर ॥ अंगीं भावाचे तरुवर ॥ २ ॥ खैर धामोडे चंदन ॥ कृष्णवेधें वेधलें मन ॥ ३ ॥ एकाएक हरिख मनीं ॥ वसंत दाटे जनार्दनीं ॥ ४ ॥

१४. माझें माहेर पंढरी ॥ विठ्ठल उभा विटेवरी ॥ १ ॥ संत मिळाले अपार ॥ करिताती जयजयकार ॥ २ ॥ टाळ घोळ पताका ॥ नाचताती वैष्णव देखा ॥ ३ ॥ विठ्ठलनामें गर्जती ॥ प्रेमभरीत नाचती ॥ ४ ॥ एका जनार्दना शरण ॥ विठ्ठल नामें धाले पूर्ण ॥ ५ ॥

१५. वैजयंती माळ किरीट कुंडलें ॥ रूप तें सांवळें विटेवरी ॥ १ ॥ वेधलें वो मन तयाच्या चरणीं ॥ होताती पारणीं[3] डोळीयांची ॥ २ ॥ पुराणासी वाड शास्त्रासी तें गूढ ॥ तें आम्हालागीं उघड परब्रह्म ॥ ३ ॥ ध्यानीं ध्याती मुनि चिंतिती आसनीं ॥ तो हा चक्रपाणी सुलभ आम्हा ॥ ४ ॥ सन्मुख भीवरा मध्यें पुंडलीक ॥ एकाजनार्दनीं सुख धन्य धन्य ॥ ५ ॥

१६. चंद्र पौर्णिमेचा दिसे पा सोज्वळ[4] ॥ तैसा श्रीविठ्ठल पंढरीये ॥ १ ॥ क्षीरसिंधुसम भीवरा ती वाहे ॥ स्नान करितां जाय महत्पाप ॥ २ ॥ सनक सनंदन सम पुंडलीक ॥ शोभा अलौकीक वर्णूं काय ॥ ३ ॥ लक्ष्मी प्रत्यक्ष रखुमाई राही ॥ एकाजनार्दनीं पायीं लीन जाला ॥ ४ ॥

---

१ जोत. २ सुवासानें. ३ इच्छा. ४ दैदीप्य.

१७. नाम घेतां रूप आठवलें सांवळें ॥ ही खूण गोपाळें दिली मज ॥ १ ॥ येणे जन्में कृष्ण दाटोनी टाकणें ॥ आडवस्तीपणें चुकविली ॥ २॥ चुकविली वस्ती एका जनार्दनें ॥ संसार सांडणें सोडोनीया ॥ ३ ॥

१८. सात्विकाभरणें रोमासी दाटणें ॥ स्वेदाचें[1] जीवन येऊं लागे ॥ १ ॥ कांपे तो थरारी स्वरूप देखे नेत्रीं ॥ अश्रू त्याभीतरीं वाहताती ॥ २ ॥ आनंद होय पोटीं स्तब्ध जाला कंठीं ॥ मौनवाक्पुटी धरुनी राहे ॥ ३ ॥ टाकी श्वासोच्छ्वास अश्रुभाव देखा ॥ जिरवुनी एका स्वरूप होय ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ऐसे अष्टभाव ॥ उत्पन्न होतां देव कृपा करी ॥ ५ ॥

१९. आवडीच्या सुखा सुखावला ॥ वैकुंठ सांडोनी पंढरीये आला ॥ १ ॥ देखोनिया पुंडलीका ॥ उभा समपायीं देखा ॥ २ ॥ न बैसे खालीं ॥ युगें अठ्ठावीस जालीं ॥ ३ ॥ ऐशी भक्ताची माउली ॥ उभी तिष्ठत राहिली ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं देव ॥ उभा राहिला स्वयमेव[2] ॥ ५ ॥

२०. स्वामीसेवका अबोला ॥ ऐसा जन्मचि अवघा गेला ॥ १ ॥ जन्मवरी जुनें भातें ॥ साधन शिऊं नेदी हातें ॥ २ ॥ काम धरूं नेदी नेदीं हातीं ॥ उसंत नाहीं अहोरातीं ॥३॥ श्रद्धेंविण आचाट सांभे ॥ ढळों नेदी पुढें मागें ॥ ४ ॥ न गणी दिवस मास वरुषी ॥ मागें जातां वहीच पुसी ॥ ५ ॥ चावा चावी करूं नेदी ॥ सगळें गिळवी त्रिशुद्धी ॥ ६ ॥ जो कां ग्लानी साधन मागे ॥ तेंचि बंधन त्यासी लागे ॥ ७ ॥ जो सेवा करी नेटका[3] ॥ त्यासी करुनी सांडी सुटका ॥ ८ ॥ झोंप लागों नेदी कांहीं ॥ निजे निज निजवी पाही ॥ ९ ॥ एकाजनार्दनीं निज सेवा ॥ जीवें उरूं नेदी जीवा ॥ १० ॥

२१. पुंडलीकें उभा केला ॥ भक्त भावाचा अंकिला ॥ १ ॥ युगें जालीं अठ्ठावीस ॥ उभा मर्यादा पाठीस ॥ २ ॥ सम पाउलीं उभा ॥ कटीं कर कर्देळी गाभा ॥ ३ ॥ गळां वैजयंती माळ ॥ मुगुट दिसतो तेजाळ[4] ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं शोभा ॥ विठ्ठल विटेवरी उभा ॥ ५ ॥

---

१ घाम. २ स्वतः. ३ नीट. ४ तेजःपुंज.

२२. सकळ सुखाचें जें सुख ॥ तेंचि सोलीव श्रीमुख ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठलीं शोभा ॥ मिरवतसे स्वयंभा[1] ॥ २ ॥ मीतूंपणाचा शेवट ॥ तोची मस्तकीं मुगुट ॥ ३ ॥ अधिष्ठान जें निर्मळ ॥ तेंचि लल्लाट सोज्वळ ॥ ४ ॥ श्रुतिविवेकें[2] ये विवेका ॥ तेंची श्रवण ऐका ॥ ५ ॥ जीवशिव एक ठसा ॥ कुंडलें सर्वांग डोळसा ॥ ६ ॥ जेकां आदित्यीं तेज तेजाळें ॥ तेंचि तया अंगीं जाले डोळे ॥ ७ ॥ चिच्छक्तीचें जाणतेंपण ॥ तेंचि नयनींचें अंजन ॥ ८ ॥ शोभा शोभविजे विक ॥ तेंची मुखींचें नासिक ॥ ९ ॥ वदन ह्मणजे सुखसागर ॥ तळपती लहरि ऐसें अधर ॥ १० ॥ सच्चित्पदाची जे माळा ॥ माळागुणें पडली गळा ॥ ११ ॥ कर्म कर्तव्य जें फळ ॥ तेंची करकटीं सरळ ॥ १२ ॥ कोहं सोहं मूस. अटी ॥ तेची आटीव बाहुवटी ॥ १३ ॥ कवणे व्यक्ति नये रूपा ॥ हृदयी पदक पहा पां ॥ १४ ॥ नाभीका पूर्णानंदीं ॥ तेंचि नाभी तया दोंदी ॥ १५ ॥ निःशेष सारुनी अंबर ॥ तो कासे पीतांबर ॥ १६ ॥ महासिद्धि ज्या वांजटा ॥ त्याची मेखळे जडल्या घंटा ॥ १७ ॥ गति चालविती गती ॥ तेची समचरण शोभती ॥ १८ ॥ अहं सांडोनी अहंकार[3] ॥ तोची चरणीं तोडर ॥ १९ ॥ अर्थाअर्थीं जडली निकीं ॥ ते शोभती वाळेवाकी ॥ २० ॥ शंख चक्र पद्म गदा ॥ चारी पुरुषार्थ आयुधा ॥ २१ ॥ शुन्याशुन्य पायातळीं ॥ तेची वीट हे शोभली ॥ २२ ॥ द्वय सारुनीया शोभा ॥ समचरणीं विठ्ठल उभा ॥ २३ ॥ चरणातळीं ऊर्ध्वरेखा ॥ जाला जनार्दनएका २४

२३. धन्य चंद्रभागा धन्य वाळुवंट ॥ तेथें सभा दाट वैष्णवांची ॥ १ ॥ ठाईंठाईं कीर्तन होत नामघोष ॥ जळताती दोष जन्मांतरींचे ॥ २ ॥ पहा तो नारद उभा चंद्रभागेंत ॥ गायन करीत नामघोष ॥ ३ ॥ धन्य विष्णु पद धन्य वेणुनाद ॥ क्रीडा करी गोविंद सर्व काळ ॥ ४ ॥ पौर्णिमेचा काला वेणुनादीं जाहला ॥ वांटितो सकळां पांडुरंग ॥ ५ ॥ स्वर्गीचे सुरवर प्रसाद इच्छिती ॥ नाहीं त्यांसी प्राप्ति अद्यापवरी ॥ ६ ॥ तुह्मां आह्मां येथें कैसें सांपडलें ॥ उपकार केले पुंडलीकें ॥ ७ ॥ धन्य ते पद्माई धन्य तें

---

१ स्वतःच्या कांतीनें. २ वेदविचार. ३ गर्व.

पद्माळ ॥ येउनी सकळ स्नानें करीती ॥ ८ ॥ धन्य दिंडीरवन रम्य स्थळ फार ॥ रखुमाई सुंदर वास करीती ॥ ९ ॥ चोखोबानें वस्ती केली ऐलथडीं ॥ उभारीली गुडी स्वानंदाची ॥ १० ॥ धन्य पुंडलीक भक्त शिरोमणी ॥ तेणें चक्रपाणी उभा केला ॥ ११ ॥ मायबापाची सेवा तेणें केली सबळ ॥ ह्मणोनी घननीळ आतुडला ॥१२॥ लोहदंड क्षेत्र धन्य पंढरपुर ॥ उभा विटेवर पांडुरंग ॥ १३ ॥ त्रैलोक्याचा महिमा आणिला तया ठायां ॥ तीर्थव्रतें पायां विठोबाच्या ॥ १४ ॥ तिहीं लोकीं पाहतां ऐसें नाहीं कोठें ॥ परब्रह्म नीट विटेवरी ॥ १५ ॥ एका जनार्दनीं ब्रह्म पाठीं पोटीं ॥ ब्रह्मनिष्ठ येती तया ठायां ॥ १६ ॥

२४. जयजयजी देवाधिदेवा ॥ पंढरिरावा श्रीविठ्ठला ॥ १ ॥ येउनीया हृदईं वसा ॥ मागणें सहसा दुजें नाहीं ॥ २ ॥ भुक्तिमुक्ति नको कांहीं ॥ लिगाड तेंही मज आतां ॥ ३ ॥ भाळीभोळी घ्यावी सेवा ॥ हीच देवा विनवणी ॥४॥ एका जनार्दनीं तुमचा दास ॥ त्याची आस पाया पैं ॥५॥

२५. कृष्णमूर्ति होयगे कळों आली सोयगे ॥ प्राणाचा ही प्राण पहातां सुख सांगूं कायगे ॥ १ ॥ तुळशीमाळ गळागे कस्तुरीचा टीळागे ॥ अर्धांगीं रुक्मिणी विंझणे वारित गोपिबाळागें ॥ २ ॥ पीतांबराची कासगे कसिली सावकाशगे ॥ नारद तुंबर गायन करती पुढें निज दासगे ॥३॥ भक्त कृपेची मायगे बोळखिली विठाईगे ॥ एका जनार्दनीं विटे देखियले पायगे ॥४॥

२६. जें या चराचरीं गोमटें ॥ पाहातां वेदां वाट न फुटे ॥ तें पुंडलीकचे पेठे ॥ उभें नीट वीटेवरी ॥ १ ॥ सोपारा सोपारा झाला आह्मा ॥ शास्त्रें वर्णिती महिमा ॥ नकळे जो अगमांनिगमां ॥ वंद्य पुराणा तिहिं लोकीं ॥२॥ सहस्रमुखाचें ठेवणें ॥ योगी ध्याती जया ध्यानें ॥ तो नाचतो कीर्तनें ॥ प्रेमळ भक्त देखोनी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देखा ॥ आह्मा झाला सुलभ सोपा ॥ निवारुनी भवतापा ॥ उतरी पैार निर्धारें ॥ ४ ॥

२७. जन्ममरण सांकडें निवारावया कोडें ॥ विठ्ठल उघडें पंढरीये ॥ १ ॥ तयाचे चरणां मिठी घाली मना ॥ नाहीं तुज यातना जन्मकोटी

---

१ रमविणारें. २ मेघश्याम. ३ आशा. ४ संसारत्रास. ५ पलीकडे.

॥ २ ॥ चंद्रभागें स्नान पुंडलीक भेटी ॥ पूर्वजां वैकुंठीं मार्ग सोपा ॥ ३ ॥ महाद्वारीं नाचा जोडोनिया पाणी ॥ पुढें चक्रपाणी उभा विटे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं तयांसी भेटतां ॥ मोक्ष सायुज्यता पाया लागे ॥ ५ ॥

२८. कस्तुरीची उटी टिलक लल्लाटीं ॥ सांवळा जगजेठी उभा विटे ॥ १ ॥ नाम हें चांगलें रूप हें चांगलें ॥ दरुशन चांगलें विठोबाचें ॥ २ ॥ आला पंढरीसी पुंडलीकाचे भक्ती ॥ दरुशनें मुक्ति पातकीयासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आनंदाचा कंद ॥ उभा तो गोविंद विटेवरी ॥ ४ ॥

२९. अणुरेणूपासोनी ब्रह्मांडीं भरला ॥ तो म्यां देखिला विटेवरी ॥ १ ॥ स्थावर जंगम भरुनी उरला ॥ तो म्यां देखिला पंढरीये ॥ २ ॥ वेद शास्त्र पुराणें गाती जयासाठीं ॥ तो पुंडलीका पाठीं उभा दिसे ॥ ३ ॥ वेडावल्या श्रुति न कळे ह्मणती ॥ तो उभा श्रीपति वाळुवंटीं ॥ ४ ॥ संताचा समागम गाती आनंदानें ॥ तो हरि कीर्तनें नाचतसे ॥ ५ ॥ एका जनार्दनीं सुखाचा सागरू ॥ विठ्ठल कल्पतरू[2] बोळला आह्मा ॥ ६ ॥

३०. परिपूर्णपणें उभा ॥ दिसे कर्दळीचा गाभा ॥ अंगींचिया प्रभा ॥ धवळलें विश्व ॥ १ ॥ धन्य धन्य पांडुरंग ॥ आह्मां जोडला वोसंग[1] ॥ कीर्ति गातां निसंग ॥ अनुवाद तयाचा ॥ २ ॥ तें सुख सांगतां कोडी ॥ पापें पळती बापुडीं ॥ यमधर्म हात जोडी ॥ नयेचि तया गांवा ॥ ३ ॥ ऐसें एकविध भावाचे ॥ संतचरण वंदिती साचे ॥ एका जनार्दनीं त्याचें ॥ दर्शन दुर्लभ[3] ॥ ४ ॥

३१. आनंदाचा भोग घालीन आसनी ॥ वैकुंठ निवासिनी तुझे नांवें ॥ १ ॥ येईवो विठ्ठले अनाथाचे नाथे ॥ पंढरीदैवत कुळदेवी ॥ २ ॥ आपुलें ह्मणावें सनाथ करावें ॥ एका जनार्दनीं वंदावें संतजना ॥ ३ ॥

३२. व्यापुनी जगीं तोचि उरला ॥ तो विटेवरी देखिला गे माय ॥ १ ॥ चतुर्भुज पीतांबरधारी ॥ गळां शोभे बरी वैजंयती गे माय ॥ २ ॥ हातीं शोभे शंख चक्र पद्म गदा ॥ रुळे चरणीं सदा तोडर गे माय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मदनाचा पुतळा ॥ देखियेला डोळां विठ्ठलरावो ॥ ४ ॥

---

१ संगती. २ कल्पवृक्ष. ३ कठीण.

३३. अष्टधातु वेगळा देखिला पुतळा ॥ जिवींचा जिव्हाळा श्रीविठ्ठल ॥ १ ॥ तयाचे चरणीं माझा दंडवत ॥ घडो आणि चित्त जडो नामीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं देखिला डोळां ॥ जीवीं जीवनकळा विठ्ठल देवो ॥ ३ ॥

३४. कल्पतरु दाता[1] पुंडलीका मुनी ॥ तयासाठीं परब्रह्म तिष्ठे अझुनी ॥ १ ॥ नवलावगे माय नवलावगे माय ॥ विटे ठेउनी पाय उभा असे ॥ २ ॥ शेष श्रमला शास्त्र भागलें ॥ वेवादिती वहिलीं अठरा ज्यासी ॥३॥ आदि अंत कोणा नकळे जयाचा ॥ मौनावली वाचा[2] वेदादिकीं ॥४॥ तो डोळे भरी पाहिला श्रीहरी ॥ एका जनार्दनीं येरझारी खुंटली देखा ॥५ ॥

३५. निंबलोण करूं पंढरीच्या सुखा ॥ आणि पुंडलीका भक्तराया ॥ १ ॥ परलोकींचे येती परतोनी मागुती ॥ सर्व सुख येथें पहावया ॥ २ ॥ अष्ट महासिद्धी जयाचिया द्वारीं ॥ होउनी कामारी वोळंगती ॥ ३ ॥ मुक्तिपद देतां न घे फुकासाठीं ॥ तें हिंडे वाळुवंटी दीन रूप ॥ ४ ॥ एका जनार्दनीं करी निंबलोण ॥ विटेसहित चरण वोवाळावे ॥ ५ ॥

३६. जन्मोजन्मी आह्मीं बहु पुण्य केलें ॥ मग या विठ्ठलें कृपा केली ॥ १ ॥ जन्मोनी संसारी झालों याचा दास[3] ॥ माझा तो विश्वास पांडुरंगीं ॥ २ ॥ भ्रमरें[4] सुवासीं मधावरी माशी ॥ तैसें या देवासी मन माझें ॥ ३ ॥ आणिका देवासी नेघे माझें चित्त ॥ गोड गातां गीत विठोबाचें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मज तेथें न्यावें ॥ हाडसोनी द्यावें संतापाशीं ॥ ५ ॥

३७. काया वाचा मन येकविध करी ॥ पाहे तो श्रीहरी पंढरीये ॥ १ ॥ ब्रह्मादिक जया ध्याती शिवादि वंदिती ॥ ती विटेवरी मूर्ति पांडुरंग ॥ २ ॥ वेद पैं भागले शास्त्रें वेवादंती[5] ॥ पुराणांसी भ्रांती अद्यापवरी ॥ ३ ॥ नेतिनेति शब्दें श्रुति त्या राहिल्या ॥ नकळे तयांला पार त्याचा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भक्तालागीं सोपा ॥ भीमा तटीं पाहे पां विठ्ठलासी ॥ ५ ॥

३८. जें जें देखिलें तें तें भंगलें ॥ रूप एक उरलें विटेवरी ॥ १ ॥ डोळियाची धणी पहातां पुरली ॥ परी वासना राहिली चरणांजवळी ॥ २ ॥ एका जनार्दनीं विश्वास तो मनीं ॥ संताचे चरणीं सदां वैसो ॥ ३ ॥

---

१ देणारा. २ वाणी. ३ सेवक. ४ भुंगा. ५ वाद करती.

३९. सर्व देवांचा हा देव ॥ उभा राव विटेवरी ॥ १ ॥ त्याचे ठाईं भाव माझा ॥ नसे दुजा पालटू ॥ २ ॥ वारंवार ठेविन डोई ॥ उगेच पाईं सर्वदां ॥ ३ ॥ नलगे भुक्ति आणि मुक्ति ॥ संत संगती मज गोड ॥ ४ ॥ त्याचें वेड माझें मनीं ॥ शरण एका जनार्दनीं ॥ ५ ॥

४०. अनादि सांवळा देखियेला डोळां ॥ मनु माझा वेधिला सांगूं काय ॥ १ ॥ जीवाविरहित झालें देह हारपलें ॥ शिवपणें गुंतलें गुरुकृपें ॥ २ ॥ जें शब्दासी नातुडे वैखरिये कानडें ॥ तें रूप उघडें पंढरीये ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जीवींचें जीवन ॥ विठ्ठल निधान विटेवरी ॥ ४ ॥

४१. द्वारकेभीतरीं ॥ कामधेनु घरोघरीं ॥ १ ॥ कैशी बरवेपणाची शोभा ॥ पहातां नयना निघती जिभा ॥ २ ॥ घरोघरीं आनंद सदा ॥ रामकृष्ण वाचे गोविंदा ॥ ३ ॥ ऐशीद्वारके परी ॥ एका शरण श्रीहरी ॥ ४॥

४२. भुक्ति मुक्तीस कारण ॥ हरीचें जन्म कर्म गुण ॥ १ ॥ हरिकीर्तनाची जोडि ॥ सकळ साधनें होतीं बापुडीं[1] ॥ २ ॥ शिळा[2] तारिल्या सागरीं ॥ गोवर्धन उचलिला करीं ॥ ३ ॥ निमाला गुरुपुत्र आणिला ॥ मुखें दावाग्नि[3] प्राशिला ॥ ४ ॥ तो. सांवळा श्रीहरी ॥ एका जनार्दनीं चरणधरीं ॥ ५ ॥

४३. सकळ देवांचा नियंता ॥ माझी विठ्ठल माता पिता ॥ १ ॥ तो हा उभा विटेवरी ॥ कट धरूनियां करीं ॥ २ ॥ मिरवे वैजयंती माळा ॥ केशर कस्तुरीचा टिळा ॥ ३ ॥ मकराकार कुंडलें ॥ करीं शंख चक्र शोभले ॥ ४ ॥ एका शरण जनार्दनीं ॥ विठ्ठल पाहे ध्यानीं मनीं ॥ ५ ॥

४४. वोस घर वस्तीस कद्या ॥ तैसें या देवा कोण पुसे ॥ १ ॥ सांडोनी पंढरिराणा ॥ वोस राना कोण धांवे ॥ २ ॥ घेती मांसाचें अवदान[4] ॥ देवपण कैचें तेथें ॥ ३ ॥ ऐसीया देवासी पुजणें ॥ एका जनार्दनीं खोटें जिणें ॥ ४ ॥



१ हेव. २ दगड. ३ अरण्यातील अग्नी. ४ आहुती.

# भक्तवात्सल्य.

१. दीनाची या कांजा ॥ धांवे वैकुंठीचा राजा ॥ १ ॥ तो हा हरि विटेवरी ॥ सम कर धरुनी करीं ॥ २ ॥ भक्ता पुंडलीका पाहे ॥ उभारुनी दृढ बाहे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण ॥ विठ्ठल नाम पतीत पावन ॥ ४ ॥

२. भोळा देव भोळा देव ॥ उंच नेणे भाव ॥ १ ॥ चोखीयाच्या मागें धांवे ॥ शेले कबिराचे विणावे ॥ २ ॥ खुरपू लागे सांवत्यासी ॥ उणें येवों नेंदी कोणासी ॥ ३ ॥ विष पिणें धाउनी जाणें ॥ भाविकाची भाजी खाणें ॥ ४॥ कण्याची तो आवडी मोठी ॥ एका जनार्दनीं लाळ घोटी ॥ ५॥

३. नामरूप मज आणिलें जिहीं ॥ त्यांची या उपकारा नोहे उतराई ॥ १ ॥ भक्ताचे उपकार कशानें फेडी ॥ यालागी त्याचें उच्छिष्ट काढी ॥ २ ॥ भक्ताचेनी पालटें येतो गर्भवासा ॥ उपकार उतराई नोहे कैसा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उतराई नोहे ॥ यालागी भक्तासी न विसंबे जीवें ॥ ४ ॥

४. गाण्याचें कीर्तन वाखाणिलें ॥ जाणीवेचें ज्ञान तें जाणिवेनें खादलें ॥ १ ॥ भवार्णव हा अवघा उभारी ॥ तो कळे जाणिवेवरी ॥ २ ॥ पंडिताचा बोध विध्वंसी वाद ॥ तपसाचें तप निर्दाळी क्रोध ॥ ३ ॥ योगियाचा योग नाडियेला सिद्धी ॥ अभिमान नाडी सज्ञानबुद्धी ॥ ४ ॥ कर्माकर्म नाडी वर्णाश्रम ॥ संबंधी विषम विकल्प करी ॥ ५ ॥ एका-जनार्दनीं भगवत्कृपा पूर्ण ॥ निराभिमानें[3] चरण धरियले ॥ ६ ॥

५. भावें घातली कास देव झाला दास ॥ सोशी गर्भवास भाविकांचे ॥ १ ॥ भावचि कारण भावचि कारण ॥ या परतें साधन आणिक नाहीं ॥ २ ॥ भावाचेनि बळें जीवपण वोवळें ॥ मन हें सोंवळें ब्रह्मसाम्य ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भावाचि कारण ॥ सच्चिदानंदावरी खूण दाविली ते ॥ ४ ॥

६. वैष्णवा घरीं देव सुखावला ॥ बाहीर[4] नवजे दवडोनी घातिला ॥१॥ देव ह्मणे माझें पुरतसे कोड ॥ संगति गोड या वैष्णवाची ॥ २ ॥ जरि देव नेउनी घातिला दूरी ॥ परतोनी पाहे तंव घरा भीतरीं ॥ ३ ॥ कीर्तनाची देवा आवडी मोठी ॥ एका जनार्दनीं पडली मिठी ॥ ४ ॥

---

१ काम. २ नाश. ३ अभिमानरहित. ४ बाहेर.

७. पतीत पावन नाम श्रीविठ्ठलाचें ॥ आणीक मी साचें नेणें कांहीं ॥१॥ पतीत पावन नाम वदे वाणी ॥ विठ्ठला वांचुनी कांहीं नेणें ॥ २ ॥ पतीत पावन नामें तारिली गणिका ॥ अजामेळ देखा सरता केला ॥ ३ ॥ पतीत पावन नाम जनीं वनीं ॥ एका जनार्दनीं नाम वाचे ॥ ४ ॥

८. स्तंभ[1] फोडीत कटकट ॥ दाढा व्यंकट विकट ॥ उद्भट विर त्रिकट ॥ नर केसरी ॥ १ ॥ जिव्हा लळलळित लटलट ॥ घुरघुरीत कंठ ॥ स्वासें नासापुट उतट ॥ पिंगट जटाजुट[2] दाट ॥२॥ बाण सणसणाट ॥ वज्र दणदणाट ॥ नखें तिखें तिखट बोट ॥ रागें फोडी पोट ॥ ३ ॥ हात तट सुभट भट ॥ नेत्र गरगराट ॥ चंद्रसूर्यगरगराट रे ॥ ४ ॥ शब्द कटकट ॥ साधनीं कष्ट फुकट ॥ एका जनार्दनीं नामें वैकुंठ पीठ रे ॥ ५ ॥.

९. गणिका नेली मोक्षपदा ॥ रामनाम वदे एकदां ॥ १ ॥ धन्य नामाचा महिमा ॥ वदतां शेषा उपरमा ॥ २॥ ध्यानीं ध्यातो शूळपाणी ॥ रामनाम निशी[3] दिनीं ॥ ३ ॥ रामनाम तें दोन अक्षर ॥ एका जनार्दनीं निर्धार ॥ ४ ॥

१०. राम भावाचा भुकेला ॥ सांडोनी दुर्योधन सदनाला ॥ ॥१॥ विदुर गृहा प्रति गेला ॥ विश्रांति तेथें पावला ॥ २ ॥ शबरीचें फळें भक्षी ॥ क्षीरनिधी शयन साक्षी॥ ३ ॥ एका जनार्दनीं निश्चय ऐसा ॥ देव भक्ताधीन सहसा॥ ४ ॥

११. विश्व पाळिताहे हरी ॥ दासा केवीं तो अव्हेरी ॥ १ ॥ नवमास गर्भवास ॥ नाहीं भागला आह्मास ॥ २ ॥ बाळपणीं वांचविलें ॥ स्तनीं दुग्ध[4] तें निर्मिलें ॥ ३ ॥ कीटक पाषाणांत वसे ॥ त्याचे मुखीं चारा असे ॥ ४ ॥ धरा धरा हा विश्वास ॥ एका जनार्दनीं त्याचा दास ॥ ५ ॥

१२. अंबऋषि राया पडिले सायास ॥ सोसी गर्भवास स्वयें देव ॥ १ ॥ उच्छिष्टही खातां प्रायश्चित्त असे ॥ गोपाळांचें ग्रास खाय हरी ॥ २ ॥ एका जनार्दनीं भक्ताचा अंकीत ॥ ह्मणोनी तिष्ठत विटेवरी ॥ ३ ॥

१३. मिठी घालुनिया भक्ता ॥ ह्मणे शिणलेती आतां ॥१॥ धांवे चुरावया चरण ॥ ऐसा लाघवी आपण ॥ २ ॥ योगीयासी भेटी नाहीं ॥ तो आवडीनें कवळी बाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनी भोळा ॥ भक्ता आलिंगी सांवळा ४

---

१ खांब. २ केश समुदाय. ३ रात्रंदिवस. ४ दूध.

१४. साचपणें देवा शरण पैं जाती ॥ तया वैकुंठपती विसरेना ॥ १ ॥ जैसीं कन्या दूरदेशीं येकटी ॥ रात्रंदिवस संकटीं घोकि मायबाप ॥ २ ॥ पतिव्रतेचें सर्व मन पतिपायीं ॥ तैसा देव ठाईं तिष्ठतसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मज हा अनुभव ॥ जनार्दनें देव दाखविला ॥ ४ ॥

१५. देव भक्त एके ठायीं ॥ संतमेळ तया गांवीं ॥ १ ॥ ते हे जाणा पंढरपूर ॥ देव उभा विटेवर ॥ २ ॥ भक्त येती लोटांगणी ॥ देव पुरवी मनोरथ मनीं ॥ ३ ॥ धांवे सामोरा तयासी ॥ आलिंगून क्षेम पुसी ॥४॥ ऐसी आवडी मानी मोठी ॥ एका जनार्दनीं घाली मिठी ॥ ५ ॥

१६. दयेचें धाम नेघे कोणचाही श्रम ॥ हरि वर्णी सप्रेम दृढ निज-भावें ॥ १ ॥ प्रसन्न होऊनी दीनातें पहातो ॥ आवडी उद्धरितो भाविकासी ॥ २ ॥ एका जनार्दनीं भक्तीसी भुलला ॥ ह्मणोनी वेडावला भक्तामागें ॥३॥

१७. देखोनीया देवभक्त ॥ सनकादिक आनंदत ॥ १ ॥ ह्मणती जावें पंढरपुरा ॥ पाहूं दीनाचा सोइरा ॥ २ ॥ आनंदें सनकादिक ॥ पाहूं येती तेथें देख ॥ ३ ॥ विठ्ठलचरणीं ॥ शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

१८. ऐशी आवडी मिनली सुखा ॥ देव उभा भक्तद्वारीं देखा ॥ १ ॥ धन्यधन्य पुंडलिका ॥ उभें केलें वैकुंठनायका ॥ २ ॥ युगें अठ्ठाविस नीट ॥ उभा विटे[1] करीं धरुनीया कटे[2] ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण जाऊं ॥ काया[3] वाचा मनें त्यासीं ध्याऊं ॥ ४ ॥

१९. माझा भक्त मज अंतरीं ॥ मी सदा बाहेरी तिष्ठतसें ॥ १ ॥ ऐशी परस्परें खूण ॥ जाणती तें ब्रह्मज्ञान ॥ २ ॥ माझी सायुज्यता मुक्ती ॥ घेउनी बळें मीच होती ॥ ३ ॥ सायुज्यापरीस भक्ति गोड ॥ एकाजना-र्दनीं धरती चाड[4] ॥ ४ ॥

२०. कैसा पुंडलीका उभा केला ॥ वैकुंठाहुनी भक्ती चाळविला ॥ १ ॥ नेणो रे कैसें बोळलें ॥ अधीन केलें आपुलीया ॥ २ ॥ दर्शन मात्रें प्राणिया उद्धार ॥ ऐशी कीर्ति चराचर ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ह्मणे पुंडलिका ॥ भक्तशिरोमणी तूंचि देखा ॥ ४ ॥

---

१ स्थान. २ कमर. ३ देहानें. ४ गरज.

२१. पूजी माझीया भक्तातें ॥ तेणें संतोष होत मातें ॥ १ ॥ भक्त माझा मी भक्तांचा ॥ ऐसी परंपरा साचा ॥ २ ॥ देव भक्तपण ॥ वेगळीक नाहीं जाण ॥३॥ भक्त देवतांची धालों ॥ एका जनार्दनीं लाधलों ॥४॥

२२. सर्व कर्म मदर्पण ॥ करितां मन शुद्ध होय ॥ १ ॥ न्यून तें चढतें जाण ॥ करी संपूर्ण मी येक ॥ २ ॥ माझ्या ठाईं ठेउनी मन ॥ करी कीर्तन आवडी ॥ ३ ॥ मन ठेउनी माझे ठाईं ॥ वसो कोठें भलते ठाईं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मन ॥ करा मजची अर्पण ॥ ५ ॥

२३. उतरावया धरांभार ॥ धरी अवतार कृपाळू ॥ १ ॥ पाळीतसे भक्तलळा ॥ नोहे वेगळा वेगळीक ॥२॥ जया आवडे जें कांहीं ॥ देतां न ह्मणे थोडें कांहीं ॥३॥ पुरवी इच्छा जैसी आहे ॥ मच्छ कच्छ तयासाठीं होय ॥ ४ ॥ ऐसा कृपेचा कोंवळा ॥ एकाजनार्दनीं पाहूं डोळा ॥ ५ ॥

२४. बैसोनीयां हाटवटी ॥ सांगे गोष्टी लौकीक ॥ १ ॥ तैसें नव्हे भक्तपण ॥ घातला दुकान पसारा ॥ २ ॥ वर्माचें तें पाठांतर ॥ केला भार बहुतची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सार ॥ भुंके फार खर जैसा ॥ ४ ॥

२५. आह्मां सकळां देखतां ॥ पुरवी लळे तो सर्वथा ॥ १ ॥ जें जें मागावें तयासी ॥ तें तें देतो निजभक्तासी ॥ २ ॥ नमने अंकिताचा शीण ॥ राहे द्वारपाळ होऊन ॥ ३ ॥ घोडें धुतलें रणांगणी ॥ एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

२६. भक्तालागी अणुमात्र व्यथा ॥ ते न साहवे भगवंता ॥ १ ॥ करुनी सर्वांगाचा वोढा ॥ निवारीतसे भक्त पीडा ॥ २ ॥ होउनी भक्ताचा अंकितू ॥ सारथीपणें तो करितू ॥ ३ ॥ प्रल्हादासी दुःख मोठें ॥ होतांची काष्ठीं प्रगटे ॥ ४ ॥ऐसा अंकित चक्रपाणी ॥ एका शरण जनार्दनी ॥ ५ ॥

२७. अंकीत भक्ताचा ॥ नीच काम करी साचा ॥ १ ॥ काढी धर्मा घरी ॥ उच्छिष्टपात्रें निर्धारीं ॥ २ ॥ कुब्जेसी रतला ॥ एकाजनार्दनी भला ॥ ३ ॥

२८. वेदी जैसा वर्णिला ॥ तैसा विटेवरी देखिला ॥ १ ॥ पुराणे सांगती ज्या गोष्टी ॥ तो विटेवरी जगजेठी ॥ २ ॥ शास्त्रें वेवादती पाही ॥ तोची

ओळ. २ कमी. ३ पृथ्वी. ४ दुःख. ५ स्वाधीन.

विटे सम पायीं ॥ ३ ॥ नकळे अकळ अगमा ॥ निगमाही न कळे सीमा ॥ ४ ॥ जाला अंकित आपण ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ ५ ॥

२९. जे जे वेळे जें जें लागे ॥ तें न मागतां पुरवी वेगें ॥ १ ॥ ऐसा भक्ताचा अंकित ॥ राहे द्वारी पैं तिष्ठत ॥ २ ॥ आवडी गौळियाची मोठी ॥ गायी राखी जगजेठी ॥ ३ ॥ भक्ति भावार्थे भुकेला ॥ एकाजनार्दनी विकला ४

३०. अंकित अंकिला ॥ देव भक्ताचा पैं जाला ॥ १ ॥ पहा पुंडलीकासाठीं ॥ उभा असे वाळुवंटीं ॥ २ ॥ युगें अठ्ठावीस जालीं ॥ न बैसे अद्यापि तो खालीं ॥ ३ ॥ न वैसेची उभा असे ॥ एकाजनार्दनीं भक्ति पिसें ॥ ४ ॥

३१. भक्ति भावार्थें अर्पिलें ॥ देवें आपणापाशीं ठेविलें ॥ १ ॥ नेदी कोणाचीये हातीं ॥ भक्तांवांचुनी निश्चितीं ॥ २ ॥ जुनाट जुगादीचें ॥ ठेवणें होतें तें संताचें ॥ ३ ॥ पुंडलीकें करुनी वाद ॥ ठेवणें केलें तें प्रसिद्ध ॥ ४ ॥ नेदी ह्मणोनी उभा केला ॥ एकाजनार्दनीं अबोला ॥ ५ ॥

३२. ज्याची प्रतिज्ञा निर्धारी ॥ देवा हरि आणियेलें ॥ १ ॥ तो हा शांत नृचा रावो ॥ भीष्म देवो[1] संग्रामीं ॥ २ ॥ शस्त्र न धरी ऐसा बोल ॥ साचा केला संग्रामीं[2] ॥ ३ ॥ विकळ पडतांची अर्जुन ॥ धरिलें सुदर्शन हस्तकीं ॥ ४ ॥ ऐसा कृपेचा कळवळा ॥ एकाजनार्दनीं पाळी ळळा ॥ ५ ॥

३३. भक्त अर्पितां सुमनमाळा ॥ घाली आवडीनें गळां ॥ १ ॥ ऐसा आवडीचा भुकाळू ॥ श्रीविठ्ठलु दीनदयाळू ॥ २ ॥ भक्तें भावार्थें अर्पितां ॥ तें आवडे पंढरिनाथा ॥ ३ ॥ भक्तासाठीं विटेवर ॥ सम पद कटीं कर[3] ॥ ४ ॥ ऐशी कृपेची कोंवळी ॥ एकाजनार्दनी माउली ॥ ५ ॥

३४. प्रत्यक्ष पाहारे जाऊन ॥ विटेवरी ठेविले चरण ॥ १ ॥ रूप सुंदर गोजिरें ॥ कानीं कुंडलें मकराकारें ॥ २ ॥ पुढें शोभे चंद्रभागा ॥ मध्यें पुंडलीका उभा ॥ ३ ॥ ऐसें उत्तम हें स्थळ ॥ भोळ्या भाविकां निर्मळ ॥ ४ ॥ तया ठायीं भेद नुरे ॥ एकाजनार्दनीं झुरे ॥ ५ ॥

३५. शरणांगता नुपेक्षी हरी ॥ ऐसी चराचरी कीर्ति ज्याची ॥ १ ॥ बिभीषणें नमस्कार केला ॥ राज्यधर केला श्रीरामें ॥ २ ॥ उपमन्या

---

१ खरा. २ रणांगणांत. ३ हात.

दुधाचा पै छंद ॥ क्षीरसागर गोविंद त्या देत ॥ ३ ॥ ध्रुव बैसविला अढळपदीं ॥ गणिका[1] बैसली मोक्षपदीं ॥ ४ ॥ ऐसी कृपेची साउली ॥ एकाजनार्दनीं माउली ॥ ५ ॥

३६. आधीं देव पाठीं भक्त ॥ ऐसें मागें आलें चालत ॥ १ ॥ हेंही बोलणेंची वावें[2] ॥ भक्ता आधीं कैचा देव ॥ २ ॥ भक्त शिरोमणी भावाचा ॥ देव लंपट जाला साचा ॥ ३ ॥ भक्तासाठीं अवतार ॥ ऐसा आहे निर्धार ॥ ४ ॥ वडील भक्त धाकुला देव ॥ एकाजनार्दनीं नाहीं संदेह[3] ॥ ५ ॥

३७. भक्तावांचुनी देव ॥ कैचें रूप कैचें नांव ॥ १ ॥ भक्तीं धरुनि आवडी ॥ देवा लाविलीसे गोडी ॥ २ ॥ भक्तावांचुनी पुसे कोण ॥ देवा नाहीं महिमान ॥ ३ ॥ भक्तीं करुनि निर्धार ॥ देवा धरविला अवतार ॥ ४ ॥ उभयतां नोहे तुटी ॥ एकाजनार्दनीं मिठी ॥ ६ ॥

---

## देवभक्तांचें ऐक्य.

१. बळी बिभीषण रावण ॥ सत्य सौरा भीष्मदेव ॥ प्रल्हाद नारद ध्रुव ॥ हे हरीचे भक्त ॥ १ ॥ हें वैष्णवांचे षट्क ॥ देहबुद्धि दाहक ॥ पठणेची पाठक ॥ मुक्त झाले ॥ धृ० ॥ अहिल्या द्रौपदी ॥ सीता तारा मंदोदरी ॥ स्मरतां पांचही नारी ॥ पाप पळे ॥ २ ॥ ऐसी जपतां नामाची ओळी ॥ महा दोषा होय होळी ॥ पतिव्रता जवळी ॥ परम पुरुष ॥ ३ ॥ स्कंद वैनतासुत ॥ भीमसेन हनुमंत ॥ बळीराम नामें घात ॥ क्षुधादिका ॥ ४ ॥ यांचें नाम घेतलीया पाठीं ॥ क्षुधा नलगे पोटीं ॥ तृप्त होय पुष्टी ॥ परमानंदें ॥ ५ ॥ कुमार नारद देख ॥ भीष्म मारुति श्रीशुक ॥ निष्ठकनैष्ठिक्य ॥ ब्रह्मचारी ॥ ६ ॥ यांचें ऐकतांची नाम ॥ विरोन जाय काम[4] ॥ मन होय निष्काम ॥ हरिच्या रूपीं ॥ ७ ॥ हरिहर हरिद्र ॥ सत्वमूर्ती हरिश्चंद्र ॥ याही नामें बळिभद्र ॥ मरण मारी ॥ ८ ॥ इही नामीं नामस्मरण ॥ विसरासी ये मरण ॥ नाठवणा आठवण ॥ वरोनी ठेली ॥ ९ ॥ महेंद्र

---

१ वेश्या. २ व्यर्थ. ३ संशय. ४ इच्छा.

महाविष्णू ॥ द्रौपद दंडपाणी ॥ आदित्याच्या स्मरणीं ॥ शांतिसुख ॥ १० ॥ ऐसी जपतां नामाची विधी ॥ आनंद होय आनंदी ॥ सहजी सहज पदीं ॥ समाधान हें ॥ ११ ॥ हें वैष्णवाचें षट्क ॥ नामीं पांची पंचक ॥ एका-जनार्दनीं अति सुख ॥ इहीं नामी ॥ १२ ॥

२. भक्तें नामगुणें मुक्ति आणिले उणें ॥ दासाचेनी स्मरणें देव भेटे ॥ १ ॥ प्रल्हाद नारद पाराशर पुंडलिक ॥ व्यास अंबऋषि आत्मनिष्ठ ॥ धृ० ॥ शुक महाभागवत निजभावें स्मरत ॥ समाधान चित्त सहजी पावें ॥ २ ॥ शौनक भीष्म देव अर्जुन महाभाव ॥ दालभ्य रुक्मांगद भगवद्भजनीं भाव ॥ ३ ॥ वशिष्ठ याज्ञवल्की बिभीषणादि भक्त ॥ एका-जनार्दनीं भक्त नामस्मरत ॥ ४ ॥

३. नावडे वैकुंठ शेषशयन ॥ वैष्णव संतजन[2] आवडले ॥ १ ॥ रमा ह्मणे कैसी नवल परी ॥ देव भुलले वैष्णवा घरीं ॥ धृ० ॥ जो नातुडे ध्यानीं समाधि साधनीं ॥ तो स्वानंदे[3] कीर्तनीं नाचतसे ॥ २ ॥ जो यज्ञाव दानीं कांहीं नेघे माये ॥ तो द्वादशीं क्षीराब्धि उंभउभ्या खाये ॥ ३ ॥ लक्ष्मी ह्मणे देव आंतुडे कवणें बुद्धि ॥ वैष्णवांची सेवा करावी त्रिशुद्धि ॥ ४ ॥ वैष्णवा घरीं लक्ष्मी कामारी ॥ एकाजनार्दनीं देव दास्यत्व करी ॥ ५ ॥

४. पेंठ पिकली संताची ॥ अवघीं स्वरूपें मुदलाचीं ॥ १ ॥ उकळ करा लवडसवडी ॥ मुद्दल देतो घडोघडीं ॥ धृ० ॥ द्वैताची दाटणी सोडी ॥ वासनेचें वासन फोडी ॥ २ ॥ आळस करितां सरेल सांत ॥ मग पडला विचारांत ॥ ३ ॥ आखीलें गुरुनामाचें ॥ स्थापिलें सुरंग भक्तीचें ॥ ४ ॥ अंगळु मंगळुं नंदभाषा ॥ द्वैत दलाल निवटील घसा ॥ ५ ॥ आंत बाहरी एकची सुत ॥ मुद्दल देतां सुखी होत ॥ ६ ॥ एका जनार्दनी एकची भेटी ॥ सरीसी संसारा होईल साठी ॥ ७ ॥

५. ज्याचेनी नामें तरीजे हें ॥ आश्चर्य मानूं किती ॥ त्याच्या दासाचेनी स्मरणें ॥ चरणा शरण ये मुक्ती ॥ १ ॥ ह्मणोनि दासातें स्मरावें ॥ दास्य दासाचें करावें ॥ हरिभक्तीचें जन्मकर्म ॥ अखंड वाचें वदावें ॥ धृ० ॥

---

१ मोठे पराक्रमी. २ साधु लोक. ३ स्वतः आनंदानें. ४ दुजा भाव.

भक्त प्रतापाची गोठी ॥ रविमंडळीं[1] तपे छाटी ॥ शेषाबाहेर काढुनी ॥ दर्भाआड धरिली सृष्टी ॥ २ ॥ दासाची अगाध शैली ॥ समुद्र भरियेला चुळीं ॥ तेही साधु तें मानिती ॥ वंदीती चरण रजधुळी ॥ ३ ॥ भक्त भजनीं देखोनि थोरी ॥ देवा आवडीं पैं भारी ॥ जैसे बाळक शृंगारिल्या ॥ माता निवतसे अंतरीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं निर्वाहो ॥ संत चरणीं ठेवा भाव ॥ हाचि एक उपाव ॥ साधू सेवेनें भुलला ॥ ५ ॥

६. ज्याचेनि तिर्थां तिर्थपण ॥ तो हृदयीं केला सांठवण ॥ १ ॥ नवल महिमा हरिदासासी ॥ तिर्थें उपजवितो त्याचे कुसी ॥ १ ॥ काशी मरणें होय मुक्ती ॥ तें न मरतां वचनें प्राप्ती ॥ २ ॥ एका जनार्दन कृपा दृष्टी ॥ सकल तीर्थें वोळंगती भेटी ॥ ३ ॥

७. जें सुख संत सज्जनाचे पायीं ॥ तें सुख नाहीं आणिके ठायीं ॥ १ ॥ तुकितां या सुखचेनि तुकें ॥ वैकुंठही होय फिकें ॥ धृ० ॥ पाहूं जातां लोकीं तिन्हीं ॥ ऐसें न दिसे आणिके ठायीं ॥ २ ॥ नवल या सुखाची गोडी ॥ हरिहर ब्रह्मा घालिती उडी ॥ ३ ॥ क्षीर सागर सांडोनि पायीं ॥ अंगें धांवे शेषशायी ॥ ४ ॥ एका जनार्दनी झाली भेटी ॥ सुख संतोषा पडली मिठी ॥ ५ ॥

८. देवपण मज आणियेलें जेही ॥ त्याचिया उपकारा नव्हे उतराई ॥१॥ भक्ताचे उपकार कैसेनि फेडी ॥ यालागी त्याचि उच्छिष्टें काढी ॥२॥ भक्ताचेनि पालटे येतो गर्भवासा ॥ उपकारा उतराई तरि नव्हे कैसा ॥३॥ एकाजनार्दनीं उतराई नव्हे ॥ यालागीं भक्तातें न विसंबे जीवेंभावे ॥४॥

९. देवा भक्ता दोही पडीपाडु नाहीं ॥ लटिकें केशवा पाहसी कायीं ॥ १ ॥ कोण थोर कोण थोर ॥ कोण थोर विचारी पां ॥ धृ० ॥ राम टके केले हारपणें दाम ॥ आह्मां अखंड घरीं रामनाम ॥ २ ॥ षड्गुण संपन्न तुझी स्थिती ॥ चौंदावें रत्न माझ्या हातीं ॥ ३ ॥ आमुची भीक ह्मणसी कुडी ॥ वामनवेषें[2] कां घेतली गोडी ॥ ४ ॥ तुजलागी गरुड वाहन ॥ तुझेनी अंगें माझें गमन ॥ ५ ॥ तुजलागी वैकुंठ मंदीरें[3] ॥ चरणें[4]जीं माझें

१ सूर्यमंडळात. २ लहान वेषानें. ३ घर. ४ पाय.

घर ॥ ६ ॥ अत्यंत प्रलई वैकुंठ मोडे ॥ चरण रजें कळिकाळ उडे ॥ ७ ॥ काईसी बिरदें खटाटोप ॥ माझेंनि तुज नांव रूप ॥ ८ ॥ त्रैलोक्य अवघें तुझ्या उदरीं ॥ त्या तुझा मी सगळा घोट भरी ॥९॥ यापरी भक्त ह्मणतां अधिक ॥ धांवोनिया देवें धरिलें मुख ॥१०॥ एकाजनार्दनीं अभिन्न झालें ॥ पोटीं रिघोनी देवें आपणासम केलें॥ ११ ॥

१०. वैष्णवा घरीं देव सुखावला ॥ बाहेरी नवचे दवडोनि घातला ॥ १ ॥ देव ह्मणे माझे पुरतसे कोड ॥ संगती हे वैष्णवाची जोड ॥ २ ॥ जरी नेउनी घातला दुरी ॥ परतुनि पाहे तव घरा भीतरी ॥ ३ ॥ कीर्तनाची देवा आवडी मोठी ॥ एकाजनार्दनीं घातली मीठि ॥ ४ ॥

११. देवासी कांहीं देखणें नसे ॥ जेथें तेथें उघडाचि दिसे ॥ १ ॥ देव निलाजिरा देव ॥ निलाजिरा पहा तुह्मी ॥ धृ० ॥ लाजेसी जेथें नाहीं ठाव ॥ पांढरा डुक्कर झाला देव ॥ २ ॥ एकाजनार्दनीं एकल्या काज ॥ भक्तींची तेणें नेली लाज ॥ ३ ॥

१२. भक्त जनांसी कृपाळ परब्रह्म साकारलें ॥ गोपिकासी क्रीडा करी अद्वैत[1] आकारलें ॥ १ ॥ तो हा भक्तिलागी देखा देव भुली भूलला ॥ आणि एक कृष्ण तोहा मज मिनला ॥ २ ॥ सनकादिकांचा जो हंस प्रऱ्हाद नरहरी ॥ भक्ति लांचावला कृष्ण गौळयाघरीं लोणी चोरी ॥ ३ ॥अनेक भक्तां लागीं अनेक झाला कृष्ण ॥ एका जनार्दनीं कृपा अखंड ब्रह्म पूर्ण ॥ ४ ॥

१३. या संतांचा कुतरा झालों ॥ ब्रह्मरसासी सोकलों ॥ १ ॥ भुंकत भुंकत गेलों ॥ ज्ञाननाथासवें बैसलों ॥ २ ॥ भुंकत भुंकत निकें ॥ ज्ञान सर्वत्र विवेकें[2] ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कुतरा ॥ दांत पाडून केला बोचरा ॥ ४ ॥

१४. धरणें दासाचा अभिमान ॥ हें व्रत परम प्रमाण ॥ धृ० ॥ शांति सतीचे वल्लभ जेकां ॥ पांडव माझे प्राण ॥ १ ॥ धरणें० ॥ तनैय[3] तुझे असुरी प्रीय मानुनी ॥ धर्म भाग करितील मान ॥ २ ॥ यास्तव एक जनार्दन साक्षी ॥ मी षड्गुण भगवान[4] ॥ ३ ॥

---

१ दुजा भाव नसणें. २ विचारानें. ३ मुलगा. ४ ऐश्वर्यवान.

१५. भोगें चेतविसील नाना[1] दुःखें ॥ तो तूं भोगचि भोगसील सुखें ॥ १ ॥ मीपण कैचें काय ॥ हानी[2] लाभ तुझा तूंचि पाहे ॥ २ ॥ भोग जें आले वाड वाड ॥ तुझें आंख अंग आह्मा आड ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एक वर्म ॥ माझेनी नांवें तूंचि भोगी कर्म ॥ ४ ॥

१६. मागतां पैं कैवाडें ॥ लुंची लागे मुंडे ॥ नागवा होउनी पुढें ॥ उभा ठाके ॥ १ ॥ मागतां फाडोवाडें ॥ धांउनीया घोडा चढे ॥ खर्ग घेऊनी वाडें ॥ करी मारामारी ॥ २ ॥ कलंकी होउनी पुढें ॥ ऋणामाजी बुडे ॥ कलीच्या अंती[3] घडे ॥ कर्म ऐसें ॥ ३ ॥ मागतां दाटोदाटी ॥ नवल त्याची गोटी ॥ लाविली लंगोटी ॥ एकाजनार्दनी नारदासी ॥ ४ ॥

१७. ज्यासी दहा शिरें माथा ॥ विस हातीं घेतां ॥ नेदुनी सर्वथा ॥ जीवें मारी ॥ १ ॥ गांठी घ्यावया नाहीं ॥ आतां करील कोई ॥ ह्मणोनी राखी गाई ॥ गवळीयांच्या ॥ २ ॥ तेथेंही न संडी परी ॥ दही दूध चोरी ॥ भोगिल्या परनारी ॥ मूळ माइके ॥ ३ ॥ बुद्धी बोध ठेला ॥ एकाजनार्दनीं अबोला ॥ कांहीं न बोले बोला ॥ ठेवणें गट्ट करुनी ठेला ॥ ४ ॥

१८. सनकादिक वेडे ॥ शुक नागवें उघडें ॥ भुलविलें रोकडें ॥ जड भरतासी ॥ १ ॥ पुंडलीकें जगजेठी ॥ उभा केला वाळुवंटी ॥ अद्यापि पैं नुठी ॥ धरणें त्याचें ॥ २ ॥ कटावर ठेउनी हात ॥ उभा असे तिष्ठत ॥ घेतलें तें निश्चित ॥ देणें नाहीं ॥ ३ ॥ धरणें न मागतां पूर्ण ॥ उडवी उडवी माणुसपण ॥ जीवा जीवपण ॥ उरों नेदी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ॥ एकपणाच्या वाणी ॥ आपणा देउनी ॥ देवो समूळ खत फाडी ॥ ५ ॥

१९. मागतां कवतुक ॥ दीन होउनी रंक ॥ दारोदारीं भीक ॥ मागों धांवे ॥ १ ॥ मग ते करी काय ॥ पाठीं देउनी पाय ॥ रसातळीं पाहे ॥ घालूं धांवे ॥ २ ॥ मागों जातां पुढें ॥ मायेचें काढी मढें ॥ उकसा[4]बुकसी रडे ॥ माये माये ह्मणोनी ॥ ३ ॥ फरशें[5] घेउनी करी ॥ ज्यातें त्यातें मारी ॥ रक्तें रक्त उरी ॥ परी देणें नाहीं ॥ ४ ॥ मागतां रोकडें ॥ एकाजनार्दनीं सांकडें ॥ मेळवोनी माकडें ॥ पाठी लागे ॥ ५ ॥

---

१ अनेक. २ नाश. ३ शेवटीं. ४ एकाएकी. ५ कुऱ्हाड.

वाचेसी उच्चार नामाचा ॥ तेणें कळिकाळाचा धाक नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संतसेवेविण ॥ आणिक साधन नाहीं दुजें ॥ ४ ॥

४०. नरदेहीं आयुष्य शत तें प्रमाण ॥ अर्धरात्र जाण जाय मध्यें ॥१॥ बाळत्व तारुण्य जरामय जाणा ॥ संपलें गणना[२] होती त्याची ॥ २ ॥ एका जनार्दनीं राहिलें भजन ॥ सर्वेचि मरण पावला वेगीं ॥ ३ ॥

४१. चरणीं ठेउनी माथा संतांसी पुसावें ॥ उगेची ऐकावें हरिकीर्तन ॥ १ ॥ कलीमाजीं श्रेष्ठ कलीमाजीं श्रेष्ठ ॥ कीर्तन बोभाटें पळती दोष ॥ २ ॥ नलगे नाना युक्ति व्युत्पत्तीचें वर्म ॥ हरीचें कीर्तन सोपें बहू ॥ ३ ॥ योग यागादिक नोहे यथासांग[३] ॥ नेणें होय भंग सर्वकर्मा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं धरुनी विश्वास ॥ जाईं तूं संतास शरण सुखें ॥ ५ ॥

४२. असोनि संसारीं आपदा ॥ वाचें वदे विठ्ठल सदा ॥१॥ नाहीं मानसीं तळमळ ॥ सदा शांत गंगाजळ[४] ॥ २ ॥ असोनीया अकिंचन ॥ जयाची वृत्ति समाधान ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ऐसे थोडे ॥ लक्षामध्यें एक निवडे ॥४॥

४३. नामपाठ करा नामपाठ करा ॥ चौऱ्याशींचा फेरा चुकवा जगीं ॥ १ ॥ नामपाठ गाये नामपाठ गाये ॥ पुनरपि[६] नये संसारासी ॥ ॥ २ ॥ एकाजनार्दनाचा नामपाठ गाय ॥ आनंदीं आनंद होय तया लागीं ॥ ३ ॥

४४. ऐका ऐका वचन माझें ॥ तुह्मी वदा विठ्ठल वाचें ॥ १ ॥ नाम परतें साधन नाहीं ॥ वेद शास्त्रें देती ग्वाही ॥ २ ॥ चार वेद सहा शास्त्र ॥ अवघा नामाचा पसर ॥ ३ ॥ अठरा पुराणांचे पोटीं ॥ नामेंविण नाहीं गोष्टी ॥ ४ ॥ नामें तारिले पातकी ॥ मुक्त जाले इह लोकीं ॥ ५ ॥ अजामेळ तारिला ॥ वाला कोळी ऋषि केला ॥ ६ ॥ गणिका नेली निज पदां ॥ रामनाम वदे एकदा ॥ ७ ॥ ऐसी नामाची ती थोरी ॥ पूतना तारिली निर्धारीं ॥ ८ ॥ आवडीनें नाम गाय ॥ एका जनार्दनीं वंदी पाय ॥ ९ ॥

४५. नामपाठ गाय संताचे संगती ॥ नाहीं पुनरावृत्ति तया मग ॥ १ ॥ नामपाठ गाय सर्व भावें मनीं ॥ चुकेल आयणी गर्भवास ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ गाय ॥ जनार्दन पाहे जनीं वनीं ॥ ३ ॥

---

१ ज्ञातारपण. २ संख्या. ३ यथोक्तरीतिनें. ४ गंगेचें पाणी. ५ थोडें. ६ पुन्हा.

४६. नामपाठ गाये सदोदित मनीं ॥ यमाची जाचणी नोहे तया ॥ १ ॥ नामपाठ भावें आदरें जो गाये ॥ सर्व सुख पाहे तया होय ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामीं धरी आवडी ॥ सर्व भावें जोडी नामपाठ ॥ ३ ॥

४७. नामपाठ सार वेदाचें तें मूळ ॥ शास्त्राचें तें फळ नामपाठ ॥ १ ॥ योग यागविधी नलगे खटपट ॥ नामपाठें स्पष्ट सर्व कार्य ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नाम पाठ घोकी ॥ गुढी तिहीं लोकीं उभारली ॥ ३ ॥

४८. नामपाठ सार सर्वांमाजी श्रेष्ठ ॥ जो गाये तो वरिष्ठ कलियुगीं ॥ १ ॥ चुकेल यातना नाना गर्भवास ॥ भय आणि त्रास नव्हे मनीं ॥२॥ जनार्दनाचा एका नामपाठ भावें ॥ आदरें गात आहे सदोदित ॥ ३ ॥

४९. नामपाठ ब्रह्म उघड बोले वाचा ॥ वेदांतीं तो साचा निर्णय असे ॥ १ ॥ नामपाठ भाव भक्ति ते कारण ॥ आणिक साधन नाहीं दुजें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका गाये तो आवडीं ॥ तोडियेली बेडी संसाराची ॥ ३ ॥

५०. नामपाठ कलीमाजीं सोपें वर्म ॥ साधन तो श्रम न करी वायां ॥ १ ॥ नामपाठ गाय नामपाठ गाय ॥ वायां तूं न जाय खटपटीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नाम सदा गाये ॥ जनार्दना पाहे काया वाचा ॥ ३ ॥

५१. नामपाठकीर्ति सर्वांत वरिष्ठ ॥ नको साधन कष्ट आणिक कांहीं ॥ १ ॥ नामपाठमाला हृदयीं ध्याई भावें ॥ उगेचि जपावें मौन्य रूप ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नाम गाय फुका ॥ साधन तिहीं लोका वरिष्ठ तें ॥ ३ ॥

५२. नामपाठ श्रेष्ठ नामपाठ श्रेष्ठ ॥ पावे तो वैकुंठ कलीमाजी[3] ॥ १ ॥ नामपाठें गेले नामपाठें गेले ॥ जड जीव उद्धरिले नामपाठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका आणिक नेणे वर्म ॥ सोपें होय कर्म नामपाठें ॥ ३ ॥

५३. नामपाठ वर्म सोपें आहे जाण ॥ चित्तीं नारायणा नामपाठें ॥ १ ॥ अष्टांग योग साधनें वरिष्ठ ॥ नामपाठेंवीण कष्ट होती जना ॥ २ ॥ जनार्दनाचा एका करी विनवणी ॥ नामपाठ निर्वाणीं शस्त्र आहे ॥ ३ ॥

५४. नामपाठ जया नाहीं पैं सर्वथा ॥ तयासी तत्वतां यमदंड ॥ १ ॥

१ प्रेमभाव. २ खरा. ३ कलियुगांत. ४ मोक्षपदी. ५ खरोखर. ६ यमाची शिक्षा.

मारिती ताडिती यमाचे ते दूत ॥ नामपाठीं चित्त करी नेणे ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगे सर्व लोकां ॥ नामपाठ घोका आळसूं नका ॥ ३ ॥

५५. नामपाठ अंडज जारज स्वेदज ॥ उद्भिज देख चार योनि ॥१॥ नामपाठ प्रेमें गाय तूं आवडी ॥ तुटेल सांकडी कर्मधर्म ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठीं निका ॥ तोडियेली शाखा द्वैताचि ते ॥ ३ ॥

५६. नामपाठ युक्ति जगीं सोपी जाण ॥ ह्मणोनी नारायणा आठवावें ॥ १ ॥ नामपाठ सोपा नामपाठ सोपा ॥ जन्म मरण खेपा दूर होती ॥ २ ॥ जनार्दनाचा एका आवडीनें गाये ॥ नाशिवंत पाहे शरीर आहे ॥ ३ ॥

५७. नामपाठ सोपा भोळ्या भाविकांसी ॥ मतवादी[3] यांसी न रुचे नाम ॥ १ ॥ नवज्वरिता दुग्ध प्राण जाय तत्त्वतां ॥ अभाविका सर्वथा गाती तेचि ॥२॥ जनार्दनाचा एका सांगे प्रेमभावें ॥ आदरें तो गावा नामपाठ ॥३॥

५८. नामपाठ करितां काळ वेळ नाहीं ॥ उच्चारुनी पाही सर्व काळ ॥ १ ॥ सर्वभावें नामपाठ तूं गाय ॥ आणिक न करी काय साधन तें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका भुलला नामपाठीं ॥ आणिक न करी गोष्टी नामावीण ॥ ३ ॥

५९. नामपाठ जगीं सोपें तें साधन ॥ ह्मणोनि वर्तती वैष्णव ते ॥ १ ॥ आनंदें नाचती टाळी वाजविती ॥ नामपाठ गाती सर्व भावें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका भुलला नामपाठीं ॥ ह्मणोनी वैकुंठीं घर केलें ॥ ३ ॥

६०. नामपाठ सोपा हरावया[4] पापें ॥ आणिक संकल्प न करी दुजा ॥ १ ॥ नामपाठें सिद्धि नामपाठें सिद्धि ॥ तुटेल उपाधि नामपाठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका गात नाचत ॥ ॥ नामपाठ करीत सर्व काळ ॥ ३ ॥

६१. नामपाठसत्ता सर्वां वरिष्ठता ॥ यमधर्म माथां वंदी पाय ॥ १ ॥ ऐसा नामपाठ भक्तियुक्त गाय ॥ पुनरपि नये संसारासी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगतसे फुका ॥ नामपाठ घोका जीवें भावें ॥ ३ ॥

६२. नामपाठ गाय धन्य तो संसारीं ॥ काय त्याची थोरी वानूं जगीं ॥ १ ॥ तयाचे चरणीं माझा दंडवत ॥ नामपाठ गात सर्वभावें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ भावें ॥ अखंड गात आहे जीवें भावें ॥ ३ ॥

---

१ सेवक. २ घामापासून उत्पन्न होणारे. ३ भिन्नमताचे. ४ हरण करण्याकरितां.

६३. नामपाठ गाय सदा नामपाठ गाय ॥ धन्य त्याची माय त्रिभुवनीं ॥ १ ॥ ब्रह्मादि वंदिती शिवादिक ध्याती ॥ नामपाठकीर्ति मुखीं गातां ॥ २ ॥ एकाजनार्दनीं साराचें हें सार ॥ नामपाठ निर्धार केला जगीं ॥ ३ ॥

६४. शास्त्रवेत्ते[1] ज्ञानी नामपाठ गाती ॥ तेणें तयां विश्रांती सर्व काळ ॥ १ ॥ पुराणें वदती[2] नामपाठकीर्ति ॥ व्यासादिकीं निश्चिती नेम केला ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगतसे गुज ॥ नामपाठ निज जपे जना ॥ ३ ॥

६५. गाये नामपाठ न करी आळस ॥ हातां येईल सौरस इच्छिलें तें ॥ १ ॥ न करी आळस आलीया संसारीं ॥ नामपाठ निरंतरी गाये सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका प्रेमें विनटला ॥ नामपाठें झाला कृतकृत्य ॥ ३ ॥

६६. नामपाठ करितां जाईल पैं चिंता ॥ मोक्षसायुज्यता हातां येई ॥ १ ॥ ह्मणोनी सोपें वर्म सांगतसें तुज ॥ नामपाठ गुज जपे सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका कुर्वंडी करुनी ॥ लोळत चरणीं संताचीया ॥ ३ ॥

६७. नामपाठें होय शुद्ध तें शरीर ॥ आणिक विचार न करी कांहीं ॥ १ ॥ नामपाठ भोळे नामपाठ भोळे ॥ शंकर तो लोळे स्मशानीं[3] तो ॥ २ ॥ जनार्दनाचा एका प्रचीत घेऊनीं ॥ नामपाठ वदनीं जपतसे ॥ ३ ॥

६८. नामपाठें गणिका नेली मोक्षपदां ॥ नामपाठें प्रल्हादा सुख झालें ॥ १ ॥ नामपाठें ध्रुव अढळपदीं बैसे ॥ नारद नाचतसे नामपाठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगे अनुभव ॥ नामपाठ सर्व जपा आधीं ॥ ३ ॥

६९. नामपाठ करूनि वाल्हा तो तरला ॥ अधिकारी झाला रामनामें ॥ १ ॥ शतकोटी कवित्व रामायण केलें ॥ जडजीव उद्धरिले तिहीं लोकीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका बोलतसे वाणी ॥ नामपाठ अमृत संजीवनी घ्यारे भावें ॥ ३ ॥

७०. नामपाठ जपे भोळा महादेव ॥ देवादि देव वंदी तया ॥ १ ॥ विष तें अमृत नामपाठें जालें ॥ दैन्य दुःख गेलें नाम जपतां ॥ २ ॥ जनार्दनाचा एका उभारुनी बाह्या ॥ नामपाठ गाय सर्व काळ ॥ ३ ॥

७१. नामपाठें नक्र तारिला निर्धारें ॥ गजेंद्र[4] उद्धरे नामपाठें ॥ १ ॥

---

१ शास्त्र जाणणारे. २ बोलती. ३ मनुष्य दग्ध करण्याच्या जागेंत. ४ मोठा हत्ती.

तरले तरले नामेंचि तरले ॥ वैकुंठासी नेले नामपाठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका जोडोनीयां हात ॥ नामपाठ गात संतांपुढें ॥ ३ ॥

७२. नामपाठ सदा एकांती जो करी ॥ भुक्ति मुक्ति चारी घरीं त्याच्या ॥ १ ॥ नलगे साधन व्युत्पत्ति पसारा ॥ नामपाठ बरा संत संगें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें निका ॥ तारिलें जड लोकां नामपाठें ॥ ३ ॥

७३. नामपाठें तारिले पतित उद्धरिले ॥ धांवणें तें केलें पांडवांचें ॥ १ ॥ पडतां संकटीं नामपाठ गाय ॥ द्रौपदी ती माय तारियेली ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगतसे लोकां ॥ नामपाठ फुका जपा आधीं ॥ ३ ॥

७४. नामपाठें आपण होय अनामिक ॥ नामपाठें देख न ह्मणे कांहीं ॥ १ ॥ उंच नीच ज्ञाती न करी विचार ॥ नामपाठें निर्धार ऐसा ज्याचा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सर्व भावें देखा ॥ नामपाठ निका गात असे ॥ ३ ॥

७५. नामपाठें जनाबाई बरोबरी ॥ दळी कांडी हरि शेणी वेंची ॥ १ ॥ भक्ताचें सकळ कार्य तें करणें ॥ नये ऐसें उणें करी काम ॥ २ ॥ जनार्दनाचा एका आवड पाहुनी ॥ नाचतो कीर्तनीं नामं गाय ॥ ३ ॥

७६. नामपाठें नामा शिंपी तो तरला ॥ तयाची देवाला आवड मोठी ॥ १ ॥ जाउनी जेवणें उच्छिष्ट भक्षणें ॥ नामपाठें देणें इच्छिलें तें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सद्गदीत होय ॥ नामपाठ गाय आवडीनें ॥ ३ ॥

७७. नामपाठें तरला चोखा तो महार ॥ भावें सर्वेश्वर स्थापीतया ॥ १ ॥ नामपाठ करूनी कीर्ति लोकीं जगीं ॥ उपमा ते अंगीं वाढविली ॥ २ ॥ जनार्दनाचा एका वर्णितो संतांसीं ॥ नित्य नामपाठासी अनुसरला ॥ ३ ॥

७८. नामपाठें गोरा कुंभार तरला ॥ उद्धार तो झाला पूर्वजांचा ॥ १ ॥ नामपाठ कीर्ति गाताती वैष्णव ॥ धन्य तो अपूर्व नाम वंदी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका एकांत चरण ॥ नामपाठ संकीर्तन करा वेगीं ॥ ३ ॥

७९. नामपाठ प्रेमें सांवता तो गाये ॥ हृदयकमळीं वाहे नारायणा ॥ १ ॥ नामपाठ निका नामपाठ निका ॥ खुर्पु लागे देखा देव त्यासी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका ऐकोनीया बोल ॥ सांगत नवल संतापुढें ॥ ३ ॥

---

१ श्रमावांचून. २ शहाणे. ३ निवडी. ४ प्रेमयुक्त. ५ विष्णु भक्त. ६ शब्द.

८०. नामपाठ भक्ति हनुमंतें[1] केली ॥ सेवा रुजु झाली देवा तेणें ॥ १ ॥ नामपाठें शक्ति अद्भुत हे अंगीं ॥ धन्य झाली जगीं कपिनाथा[2] ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सेवोनी आदरें ॥ नामपाठ स्मरे सर्व काळ ॥ ३ ॥

८१. नामपाठें सोपान समबुद्धि झाला ॥ विश्रांति पावला संवत्सरीं ॥ १ ॥ मुख्य ब्रह्मा तो नामपाठ वंदी ॥ इतर तरणें उपाधि पासोनीया ॥ २ ॥ जनार्दनाचा एका कांहीं नेणे देखा ॥ नामपाठें सुखा सुख झालें ॥ ३ ॥

८२. नामपाठें निवृत्ति पावला विश्रांती ॥ नामपाठें शांति कर्माकर्मीं ॥ १ ॥ ह्मणोनी प्रेमभावें नामपाठ गावे ॥ आलिंगन द्यावें संतचरणा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका चिंती नामपाठ ॥ मोक्षमार्गवाट सोपी जगा ॥ ३ ॥

८३. नामपाठें अक्रूर सर्व ब्रह्मरूप ॥ भेदाभेद संकल्प मावळले ॥ १ ॥ वंदी रज माथां घाली लोटांगण ॥ द्वैताचें बंधन तुटोनी गेलें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें मुक्त ॥ जालासे सतत संतचरणीं ॥ ३ ॥

८४. नामपाठें सर्व मुक्तत्व साधिती ॥ नामपाठें विरक्ति[3] हाता येत ॥ १ ॥ नामपाठें उद्धव उरला तरला ॥ नामपाठें झाला शापमुक्त ॥ २ ॥ जनार्दनाचा एका बोले लडिवाळ ॥ नामपाठ काळ काळाचाही ॥ ३ ॥

८५. नामपाठें मुक्त मुक्ताई पैं झाली ॥ हृदयीं आटली नामपाठें ॥ १ ॥ देहादेह सर्व निरसिले चारी ॥ नामपाठ वरी मुक्त झाले ॥ २ ॥ जनार्दनाचा एका बोले करुणावचनीं ॥ नामपाठ ह्मणी विसरूं नका ॥ ३ ॥

८६. नामपाठें ज्ञानीयाची भिंत वोढी ॥ भाविकां[4] तांतडी देव धांवे ॥ १ ॥ बोलविला रेडा केलेंसे कवित्व ॥ नामपाठें मुक्त केले जन ॥ २ ॥ जनार्दनाचा एका लागतो चरणीं ॥ जावें वोवाळोनी जन्मोजन्मीं ॥ ३ ॥

८७. नामपाठें बिभीषण सर्वांत वरिष्ठ ॥ वंश तो स्पष्ट देशोधडी ॥ १ ॥ जाउनीं शरण चिरंजीव झाला ॥ नामपाठें घाला कल्पवरी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका मिरवी बडीवार ॥ नामपाठ सार युगायुगीं ॥ ३ ॥

८८. नामपाठ मच्छिंद्र गोरक्षातें बोधी ॥ तोडिली उपाधि चौदेहांची[5] ॥ १ ॥

---

१ मारुतीला. २ वानर श्रेष्ठ. ३ सर्व विषयांपासून दूर. ४ घाईनें. ५ जन्ममरणरहित.

नामपाठें मोक्षमार्ग तो सर्वदा ॥ वाचे गातां बाधा नोहे कांहीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका द्वैताविरहित ॥ नामपाठ गात सर्वभावें ॥ ३ ॥

८९. नामपाठें भीष्में कामातें जिंकिलें ॥ सार्थक पैं केलें विहिताचें ॥ १ ॥ आदरें आवडी नामपाठ गाय ॥ सर्वांवरी होय सत्ता त्याची ॥ २ ॥ जनार्दनाचा एका होउनी शरण ॥ घाली लोटांगण संतचरणीं ॥ ३ ॥

९०. नामपाठें गुण झाले पैं त्रिगुण ॥ अनाम लक्षण नामपाठें ॥ १ ॥ सैर सैराटां धांवें जे वाटा ॥ तयाच्या चेष्टा न चलती तेथें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका एकपणें बोधिला ॥ जनार्दन वोळला कामधेनू ॥ ३ ॥

९१. नामपाठें अहं सोऽहं कोऽहं खादलें ॥ परब्रह्म लक्षिलें नामपाठें ॥१॥ अहं अहंपण सोऽहं सोऽहंपण ॥ नाम हेंचि खूण नामपाठ ॥ २ ॥ जनार्दनाचा एका कोऽहंपणा वेगळा ॥ जनार्दनें कुर्वाळिला अभयदानीं ॥ ३ ॥

९२. नामपाठें निवृत्ति ज्ञानदेवा उपदेशी ॥ अहं सोऽहं कोऽहं साक्षी केले ॥१॥ तिन्ही परता बोध तयासी बोधिला ॥ नामपाठें झाला शांतरूप ॥२॥ जनार्दनाचा एका गमोनी मनासी ॥ लागतो चरणासी जनार्दना ॥ ३ ॥

९३. नामपाठें गहिनी निवृत्ति वोळला ॥ उघड तो केला परब्रह्म ॥ १॥ नामपाठ ब्रह्म नामपाठ ब्रह्म ॥ आणिक नेणें सर्व नामेंविण ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सेवेसी नटला ॥ नामपाठें केला जनार्दन ॥ ३ ॥

९४. नामपाठें गोरक्ष वोढला गहिनी ॥ दाविली उन्मनी सर्वकाळ ॥१॥ समाधि आसन सैरा ते बोल ॥ नामपाठ मोल अभ्यासिलें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नेणे तो उन्मनी ॥ सदा संतचरणीं मिठी घाली ॥ ३ ॥

९५. नामपाठें क्रिया नामपाठें कर्म ॥ नामपाठें वर्म हाता येत ॥ १ ॥ तो हा सोपा योग नामपाठ वाचे ॥ न करीं सायासाचें वर्म कांहीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका भक्तीसी भुलला ॥ मोकळा मार्ग केला नामपाठें ॥ ३ ॥

९६. नामपाठ गीता ज्ञानेश्वरी होय ॥ स्मरें तूं निर्भय ज्ञानदेवी ॥ १ ॥ नामपाठ सोपें अक्षरें तीं उच्चार ॥ ज्ञानेश्वरी उच्चार करी वाचें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका ज्ञानेश्वरी ध्याय ॥ तेणें मुक्त होय युगायुगीं ॥ ३ ॥

---

१ त्रास. २ व्यापार. ३ पाहिलें. ४ पलीकडे. ५ भय टाकून.

९७. नामपाठ गीता नामपाठ गीता ॥ नामपाठ गीता गाय सदा ॥१॥ हाचि बोध सोपा अर्जुना उपदेश ॥ नामपाठें क्लेश[1] सर्व गेले ॥२॥ जनार्दनाचा एका वाचे गाय गीता ॥ हरपली चिंता जन्म मरण ॥३॥

९८. नामपाठें वर्म वेदांचें तें कळे ॥ नामपाठबळें शास्त्रबोध[2] ॥ १ ॥ या दोंहींचें वर्म ज्ञानदेवी जाणा ॥ जपे कां रे जना हृदयीं सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका विनीत होउनी ॥ आठवितो मनीं ज्ञानदेवा ॥ ३ ॥

९९. नामपाठ ज्ञानदेवीं नामपाठ तूं करी ॥ चुके वेरझारी चौऱ्याशीची ॥ १ ॥ ऐसे वर्म सोपें सांगों जगा गुज ॥ ज्ञानेश्वरी निजीं जपो आधीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका चरणीं विनटला ॥ धन्य धन्य झाला ज्ञानदेवीं ॥३ ॥

१००. नामपाठें संदेह सर्व हा जाईल ॥ नामपाठ गाईल प्रेमभावें ॥१॥ नामपाठ सोपा नामपाठ सोपा ॥ अहर्निशीं[3] बापा जप करीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका ठेउनी विश्वास ॥ नामपाठ निजध्यास करी सदा ॥ ३ ॥

१. नामपाठयुक्ति भाविका प्रतीती ॥ लोभीया विरक्ति नामपाठें ॥ १ ॥ नामपाठें याग नामपाठें योग ॥ नामपाठें भोग सरे आधीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका भोगातीत[4] झाला ॥ ह्मणोनी बोळला जनार्दन ॥ ३ ॥

२. नामपाठ साधन याहुनी आहे कोण ॥ कासयासी पेणें स्वर्गवास ॥ १ ॥ जन्म देईं देवा जन्म देईं देवा ॥ गाईन मी देवा नामपाठ ॥ २ ॥ जनार्दनाचा एका बोलतसे वाणी ॥ नामपाठें जनीं जनार्दन ॥ ३ ॥

३. नामपाठें संत पावले विसावा ॥ आणिक नाहीं हेवा दुजा कांहीं ॥ १ ॥ नामपाठें सिद्धि येईल हाता ॥ मोक्षमार्ग तत्त्वतां नामपाठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें तरला ॥ उद्धार तो केला जडजीवां ॥ ३ ॥

४..नामपाठें मोक्ष पाविजे तत्त्वतां ॥ आणिक तें आतां साधन नाहीं ॥ १ ॥ नामपाठ सार नामपाठ सार ॥ न करीं विचार आणिक दुजा ॥२॥ जनार्दनाचा एका नामपाठ गाये ॥ आदरें[5] नाचताहे संतापुढें ॥ ३ ॥

५. नामपाठ मंत्र सर्वांत पैं श्रेष्ठ ॥ तेणें तें वैकुंठ सरतें केलें ॥ १ ॥

---

१ यातना. २ शास्त्राचें ज्ञान ३ रात्रंदिवस. ४ भोगाच्या पलीकडील. ५ भक्तिभावानें.

नामपाठें साधे साधन तत्त्वता ॥ मोक्ष सायुज्यता हाता लागे ॥ ॥ २ ॥
जनार्दनाचा एका प्रेमें नाम गाय ॥ उभारुनी बाहे सांगतसे ॥ ३ ॥

६. नामपाठें युक्ति साधन समाप्ती ॥ नोहे दुजी प्रीति नामपाठें ॥ १ ॥
आणिक खटपट कासया[1] बोभाट ॥ नामपाठ वाट वैकुंठाची ॥ २ ॥ जनार्दना एका नामपाठें रंगला ॥ आनंदें वहिला नाचतसे ॥ ३ ॥

७. नामपाठ कसवटी अखंड[2] ज्याचे मुखीं ॥ तोचि झाला सुखी इहीं जनीं ॥ १ ॥ नामपाठ धन्य नामपाठ धन्य ॥ नामपाठ धन्य कलीमाजी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें मिरवला ॥ श्रीरंग वरीला नामपाठें ॥३॥

८. नामपाठ पसारा घे रे मुखें सदा ॥ कलिकाळाची बाधा तुज नोहे ॥ १ ॥ नाम तें सोपें नाम तें सोपें ॥ नाम तें सोपें विठ्ठलाचें ॥ २ ॥
जनार्दनाचा एका नामपाठ वाणी ॥ कीर्ति त्रिभुवनीं नामपाठें ॥ ३ ॥

९. नामपाठ करितां आनंद मानसीं ॥ योगयागराशी पायां लागे ॥ १ ॥ आनंदें आवडी नामपाठ गाये ॥ तारिताहे बाहे उभा जना ॥ २ ॥
जनार्दनाचा एका सांगे जगाप्रति ॥ नामपाठें विश्रांति होईल जना ॥३ ॥

१०. नामपाठें ज्ञान नामपाठें ध्यान ॥ नामपाठें मन स्थिर होय ॥ १ ॥
जगांत हें सार[3] नामपाठ भक्ति ॥ आणिक विश्रांति नाहीं नाहीं ॥ २ ॥
जनार्दनाचा एका अखंड नाम गाये ॥ हर्षें नाचताहे प्रेमरंगीं ॥ ३ ॥

११. संसार पाल्हाळ सांगती परि कर ॥ नामपाठ सार सिद्धवरी ॥ १ ॥
न करीं आळस नामपाठ गातां ॥ तुटे भवचिंता[4] नाना व्याधी ॥ २ ॥
जनार्दनाचा एका जनार्दन चरणीं ॥ भासे जनीं वनीं जनार्दन ॥ ३ ॥

१२. नामाचेनी पाठें जाती पैं वैकुंठीं ॥ आणिक खटपटी न तरती ॥१॥
आठवा नामपाठ आठवा नामपाठ ॥ वाउगा बोभाट करूं नका ॥ २ ॥
जनार्दनाचा एका नामपाठें तरला ॥ जनार्दन जोडला गुरु मज ॥ ३ ॥

१३. नामपाठ नित्य एक नेमें गाय ॥ हरिकृपा होय तयावरी ॥ १ ॥
अंतरीं बाहेरीं रक्षी नारायण ॥ आलीया विघ्न निवारी[5] साचें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका प्रचीत घेउनी ॥ गात असे वाणीं नामपाठ ॥ ३ ॥

---

१ कशाकरितां. २ चिरकाल. ३ मुख्य. ४ संसाराची काळजी. ५ दूर करी.

१४. नामपाठ श्रेष्ठ तीर्थांचें तें तीर्थ ॥ वदे तूं चिंतारहित[1] सर्वकाळ ॥१॥ काळाचे ते काळ नामपाठ गाते ॥ काळ हा तयांतें नमस्कारी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका काळा बांधी चरणीं ॥ ह्मणोनी जनार्दनीं विनटला ॥ ३ ॥

१५. नामपाठ गंगा सागर तें तीर्थ ॥ पवित्रापवित्र नामपाठ ॥ १ ॥ पर्वकाळ संतसमागम जाणा ॥ नामपाठ स्नाना आदरेंसी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका काया वाचा मनें ॥ विनटला चरणीं जनार्दना ॥ ३ ॥

१६. नामपाठ गंगा नामपाठ गंगा ॥ दोष जाती भंगों[2] नामपाठें ॥ १ ॥ नामपाठ सरिता[3] सागरसंगम ॥ देव भक्त नाम तिन्ही बोध ॥ २ ॥ जनार्दनाचा एका करितो मार्जन ॥ त्रिवेणीचें स्नान पुण्य जोडे ॥ ३ ॥

१७. नामपाठ यश कीर्ति नामपाठें ॥ तो जाय वैकुंठा हेळामात्रें ॥१॥ न करीरे जना आळस मानसीं ॥ नामपाठ अहर्निशीं जपे सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगतो आदरें ॥ नामपाठ स्मरें वेळोवेळां[4] ॥ ३ ॥

१८. आणिक साधन नाहीं नाहीं जगीं ॥ नामपाठ वेगीं गाय जना ॥ १॥ तुटती बंधनें खुंटेल पतन ॥ नामपाठ खूण वैकुंठाची ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें रंगला ॥ भोंळया भाविकाला नामपाठ ॥ ३ ॥

१९. नामपाठ स्नान नामपाठ दान ॥ नामपाठ ध्यान जनार्दन ॥ १ ॥ नामपाठ संध्या नामपाठ कर्म ॥ नामपाठें धर्म सर्व जोडे ॥ २ ॥ जनार्दनाचा एका करी नामपाठ आणिक नाहीं श्रेष्ठ नामेंविण ॥ ३ ॥

२०. चंचळ[5] तें मन मुष्टिमाजी धरीं ॥ नामपाठ हरि गाये सदा ॥ १ ॥ जोडेल सर्व सिद्धि तुटेल उपाधी ॥ नामपाठ आधीं भावें गाय ॥ २ ॥ जनार्दनाचा एका निश्चयें करूनि ॥ नामपाठ निर्वाणीं जपतसे ॥ ३ ॥

२१. नामपाठ केशव वदा नित्य वाचे ॥ सार्थक देहाचें सहजासहज ॥ १ ॥ आठवीं केशव आठवीं केशव ॥ ठेवीं तूं भाव केशवचरणीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका केशवीं विनटला ॥ प्रेमें तो दाटला हृदयामाजी ॥ ३ ॥

२२. नामपाठ नारायण वदे सर्वकाळ ॥ काळाचा तो काळ नारायण ॥१॥ नारायण गाय नारायण ध्याय ॥ नारायण पाहे सर्वां ठायीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नारायणीं प्रेम ॥ आणिक नाहीं नेम दुजा कांहीं ॥ ३ ॥

---

१ चिंता सोडून. २ नाश. ३ नदी. ४ वारंवार. ५ चपळ.

२३. नामपाठ माधव सदा तूं उच्चारीं ॥ माधव अंतरीं धरुनी राहें ॥१॥ माधव माधव आठवी यादवा ॥ आणिक धांवाधांव करूं नको ॥ २ ॥ जनार्दनाचा एका माधवीं मुराला ॥ वसंत तयाला जनार्दन ॥ ३ ॥

२४. नामपाठ गोविंद हाची लागे छंद ॥ न करी भेदाभेद हृदयामाजी ॥ १ ॥ गोविंदनाम गाय गोविंदनाम गाय ॥ गोविंदनाम गाय हृदयीं सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका हृदयीं ध्याये सच्चिता ॥ गोविंद गीतीं गातां सुख जोडे ॥ ३ ॥

२५. विष्णुनामपाठ करीं वेळोवेळा ॥ पाहें तूं सांवळा विष्णुसखा ॥१॥ विष्णुनाम गाय अंतरी सर्वदा ॥ तुटे जन्मजराबाधा येणें नामें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका विष्णुरूप देखा ॥ जनार्दनसखा एक रूप ॥ ३ ॥

२६. नामपाठें मधुसूदन वाचे ॥ अनंत जन्मांचे दोष जाती ॥ १ ॥ मधुनामें जैसा मक्षिकेसी वेधू ॥ तैसा तूं बोधू धरी देहीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका मधुरें बोले वाणी ॥ मधुसूदन उपाधि नेणे दीठी ॥ ३ ॥

२७. नामपाठ त्रिविक्रम वदें तूं रे वाचे ॥ अनंत जन्मांचे दोष जाती ॥ १ ॥ बळीये द्वारीं त्रिविक्रम उभा ॥ नामपाठें उभा तुजपुढें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका त्रिविक्रमीं वंदी ॥ साधन उपाधि नेणे आन ॥ ३ ॥

२८. नामपाठें वामन अक्षरें तीं तीन ॥ आणिक योग साधन आन नाहीं ॥ १ ॥ वदें तूं वामन वदें तूं वामन ॥ विषय वमन करुनी सांडीं ॥२॥ जनार्दनाचा एका नसे तो पारखा ॥ वामन तेणें सखा जोडियेला ॥ ३ ॥

२९. नाम तें सार श्रीधराचें वाचे ॥ कोटी जन्मांचे दोष जाती ॥ १ ॥ जपें तूं आवडी धरुनीया गोडी ॥ युगाऐसी घडी करुनीया ॥२॥ जनार्दनीं एका श्रीधर निजसखा ॥ नोहे तो पारखा जनार्दनीं ॥ ३ ॥

३०. नाम हृषीकेश गाये सावकाश ॥ धरुनी उदास देहआशा ॥ १ ॥ जाईल जाईल देह नाशीवंत ॥ नाम तें शाश्वतें हृषीकेश ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नाम गाय सदा ॥ पंचभूत बाधा तेणें नोहे ॥ ३ ॥

---

१ तल्लीन झाला. २ माशीला ३ गोड. ४ बळी राजाच्या. ५ निरंतर.

३१. नाम तें सोपें पद्मनाभ पाठ ॥ करीं तूं बोभाट दिवसनिशीं ॥ १ ॥ चौसष्ट घडीयां[1] माजी जपें नामावळी ॥ कळीकाळ टाळी मारूं न शके ॥२॥ जनार्दनाचा एका नामीं तो निर्भय ॥ कळीकाळ वंदी पाय जन्मोजन्मीं ॥३॥

३२. दामोदर गावा दामोदर पहावा ॥ दामोदर राखावा हृदयामाजी ॥ १ ॥ गोपीराजीं ध्यान दामोदरीं मन ॥ चुकलें बंधन नाम घेतां ॥ २ ॥ जनार्दनाचा एका दामोदरीं मिनला ॥ कृतकृत्य झाला उभय लोकीं ॥३॥

३३. नाम तें सोपें संकर्षण जपें ॥ आणिक संकल्पें धरूं नको ॥ १ ॥ धरितां संकल्प नाशीवंत बापा ॥ नामजप सोपा मंत्रमार्ग ॥ २ ॥ जनार्दनाचा एका बोले लडीवाळ ॥ जनार्दन कृपाळ[3] जगीं तोची ॥ ३ ॥

३४. वासुदेव नाम प्रातःकाळीं वाचे ॥ धन्य जन्म त्याचें सुफळ सदा ॥ १ ॥ वेहातां[2] टाळी मुखीं नाम सार ॥ वासुदेव उच्चार करीं आधीं ॥२॥ जनार्दनाचा एका एकपणें देखा ॥ जनार्दन सखा जोडियेला ॥ ३ ॥

३५. नामजप वाचा प्रद्युम्न साचा ॥ न करीं नामाचा आळस कदा ॥१॥ संसारयातना जाती पां निर्धारें ॥ नाम निरंतर जपें आधीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका त्रैलोक्याचा सखा ॥ झाली पूर्ण कृपा जनार्दन ॥ ३ ॥

३६. नाम अनिरुद्ध जगीं तें प्रसिद्ध ॥ अहंसोऽहंबोध गिळोनी गाय ॥ १ ॥ अहंकार सांडी नाम मुखें मांडी ॥ साधन देशधडी करुनी जपे ॥ २ ॥ जनार्दनाचा एका साधन सारुनी ॥ जनार्दन चरणीं विनटला ॥३॥

३७. नाम पुरुषोत्तम घेईं तूं आवडी ॥ यातना कल्पकोडी नाहीं तुज ॥ १ ॥ नाम हें आठवीं नाम हें आठवीं ॥ हृदयीं सांठवी पुरुषोत्तमा ॥२॥ जनार्दनाचा एका पारखी[4] नेटका ॥ पुरुषोत्तम सखा जोडिलासे ॥ ३ ॥

३८. नाम तूं अधोक्षज घेईं सर्वकाळ ॥ महाकाळाचा काळ अधोक्षज ॥ १ ॥ नामीं धरुनी प्रीति आठवीं सर्वदा ॥ नाहीं तुज बाधा जन्मोजन्मीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका प्रेमें विनटला ॥ आपुलासा केला जनार्दन ॥३॥

३९. नाम नारसिंह नाम नारसिंह ॥ भक्तासी तो सम सर्वकाळ ॥ १ ॥

---

१ घटिकां. २ वाजवितां. ३ दया करणारा. ४ परिक्षक.

जपे तो प्रऱ्हाद आवडी तें नाम ॥ पावला सर्वोत्तम तयालागीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका रूप तें पाहुनी ॥ नारसिंह चरणीं मिठी घाली ॥ ३ ॥

४०. वदे तूं अच्युत सर्वकाळ सदा ॥ मायापाशबंध तुटोनी जाय ॥१॥ करीं कां रे नेम धरीं कां रे प्रेम ॥ अच्युताचें नाम वदें सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका अच्युत पैं झाला ॥ सप्रेमें रंगला प्रेमरंगीं ॥ ३ ॥

४१. नाम जनार्दन रूप जनार्दन ॥ ध्यान जनार्दन सर्व मज ॥ १ ॥ माय जनार्दन बाप जनार्दन ॥ जन जनार्दन सर्व मज ॥ २ ॥ जनार्दनाचा एका जनार्दन देखा ॥ जनीं वनीं[३] सखा जनार्दन ॥ ३ ॥

४२. नाम उपेंद्र सर्व देवाचा तो इंद्र ॥ शुभकाळ वक्र जप सदा ॥१॥ तें नाम सोपें जपें कां रे वाचे ॥ अहर्निशीं साचें नाम जप ॥ २ ॥ जनार्दनाचा एका एक भावें नटला ॥ हृदयीं सांठविला जनार्दन ॥ ३ ॥

४३. नाम हरि हरि संसार तो हरी[१] ॥ सबाह्य अभ्यंतरीं[२] हरि माझा ॥१॥ हरिनाम जपे हरिनाम जपे ॥ तें वर्म सोपें हरि जपे ॥ २ ॥ जनार्दनाचा एका हरिचरणीं देखा ॥ सुखासुखसुखा अनुभवली ॥ ३ ॥

४४. नाम श्रीकृष्ण उद्धवें साधिलें ॥ चोविस नामें झालें जपपर्व ॥१॥ आठवा श्रीकृष्ण आठवा श्रीकृष्ण ॥ आठवा श्रीकृष्ण वेळोवेळां ॥ २ ॥ जनार्दनाचा एका श्रीकृष्ण निजसखा ॥ जनार्दनें देखा दावियेला ॥ ३ ॥

४५. नामपाठ विठ्ठल पंचविसावा वाचें ॥ सार्थक जन्माचें झालें झालें ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल वदतां[४] वो वाचें ॥ सार्थक जन्माचें झालें साचें ॥२॥ जनार्दनाचा एका नाम पाठ गाये ॥ विठ्ठल विठ्ठल ध्याये वेळोवेळां ॥३॥

४६. झाला नामपाठ झाला नामपाठ ॥ मोक्षमार्ग वाट सोपी झाली ॥१॥ आवडी आदरें नामपाठ गाये ॥ हरिकृपा होय तयावरी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें निका ॥ तोडीयेली शाखा अद्वैताची ॥ ३ ॥

४७. लेंकुरें खेळती वो साचें ॥ मायबाप प्रेमें नाचे ॥ १ ॥ तैसा हेत पांडुरंगीं ॥ धरितां उणें काय जगीं ॥ २ ॥ जैसा जैसा छंद त्याचा ॥ पुरवणें लागे साचा ॥३॥ एका जनार्दनाचें बाळ ॥ कौतुकें खेळतसे खेळ ॥४॥

---

१ हरण करी. २ आंत. ३ रानांत. ४ बोलतां. ५ ढहाळी.

४८. बोल बोलतां वाचे ॥ नाम आठवीं विठ्ठलाचें ॥ १ ॥ व्यर्थ बोलणें चावटी ॥ वांचुनी नको नाम ओंटीं ॥ २ ॥ नाम हें परमामृत ॥ नामें पावन तिन्ही लोक ॥ ३ ॥ नाम सोपें भूमंडळीं॥ महापापां होय होळी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण ॥ नाम पतीतपावन ॥ ५ ॥

४९. खेळ मांडिला वो खेळ मांडिला वो ॥ या संसाराचा खेळ मांडिला वो ॥ १ ॥ पंच प्राणांचे गडी वांटिले ॥ तेथें जीवशिव नाम ठेविलें वो ॥ २ ॥ एकाजनार्दनीं खेळ मांडिला ॥ शाहणा तो तेथें नाहीं गुंतला वो ॥ ३ ॥

५०. शुकादिक योगी रंगले श्रीरंगीं ॥ नाम पवित्र जगीं जपा आधीं ॥ १ ॥ साधनें साधितां कष्ट होती जीवा ॥ नाम सोपें सर्वां गोड गातां ॥ २ ॥ परंपरा नाम वाचे ते सुगम ॥ सनकादिक श्रम न करिती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम तें पावन ॥ वाचे उच्चारितां जाण श्रम हरे ॥ ४ ॥

५१. नामस्मरण अह्मो जना ॥ तेणें तुटे भवबंधना ॥ येची देहीं येचि काळीं ॥ भजीजे रे नाम जाणा ॥ १ ॥ ध्रुव अजामेळ गणिका ॥ नाममात्रें तारिले देखा ॥ आणिकही भक्त देखा ॥ मोक्ष पावले नामें ऐका ॥ २ ॥ जो जो कोणी प्रेमें भजतां ॥ पाविजेल सायुज्यता ॥ ऐसी भाक घेरे आतां ॥ जपतपनाम स्मरतां ॥ ३ ॥ दीनबंधु दयासिंधू ॥ जेणें केला परमानंदू ॥ दुष्ट जना करी भेदू ॥ एका जनार्दनीं नित्यानंदू ॥ ४ ॥

५२. योग याग तप व्रतें आचरतां ॥ नाम सोपें गातां सर्व जोडे ॥ १ ॥ पाहोनीया प्रचीत[2] नाम घे अनंत ॥ तुटे नाना घात जपें नाम ॥ २ ॥ एका जनार्दनीं नामाचा महिमा ॥ वर्णितां उपरमा शेष आला ॥ ३ ॥

५३. कलियुगामाजीं थोर झालें पाषांड ॥ पोटासाठीं संत झाले उदंड[3] ॥ १ ॥ नाहीं विश्वास संत दया मानसीं ॥ बोलती वायांविण सौरस अवघा उपहासी[4] ॥ २ ॥ वेदपठण शास्त्रसंभाषण पुराण मत ॥ अवघे बोधोनी ठेविती बोलती वाचाळ मत्त[5] ॥ ३ ॥ देवभजन संतपूजन तीर्थमहिमा

१ पृथ्वीवर. २ अनुभव. ३ पुष्कळ. ४ निंदाकरी. ५ माजलेले.

न कळे मूढा ॥ ऐसे कलियुगीं झाले जाणत जाणत दगडा ॥४॥ एका जना" र्दनीं काया वाचा राम जपा ॥ सोपें हें साधन तेणें नोहे पुण्यपापा ॥ ५ ॥

५४. अष्टही प्रहर करिसी संसाराचा धंदा ॥ कां रे त्या गोविंदा स्मरसी ना ॥ १ ॥ अंतकाळीं कोण सोडवील तूंतें ॥ कां रे स्वहितातें विसरलासी ॥ २ ॥ यमाची यातना न चुके बंधन ॥ सोडवील कोण तुजलागीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं गुंतलासी वांया ॥ भजें यादवराया विसरूं नको ॥ ४ ॥

५५. अशाश्वत[1] देह काळाचें भातुकें[2] ॥ पंचप्राण कौतुकें खेळ तेथें ॥१॥ जीव शिव दोन्ही मध्य बैसाकार ॥ व्यापारीं व्यापार सर्व त्याचा ॥ २ ॥ जीव गुंतलासे विषयाचे वोढी ॥ शिव जाणे गोडी आत्मस्वरूप ॥ ३ ॥ ऐसा हा खेळ अनादि पसार ॥ एकाजनार्दनीं निर्धार नाम जपा ॥ ४ ॥

५६. येवढा मंत्र सोपा सांडोनी सायासीं ॥ कां रे प्रपंचासी गुंतुनी पडसी ॥ १ ॥ वाचे ब्रह्मज्ञान गोष्टी ते बोल ॥ अंतरींचें फोल सर्व वायां ॥ २ ॥ वृंदावनाचे परी रवरव रेखा ॥ तैसे पढतमूर्खा वेदगोष्टी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रपंच टाकूनी ॥ परमार्थसाधनीं रिघे वहिला ॥ ४ ॥

५७. वांयासी सोस संसारकामाचा ॥ रामनामीं वाचा रंगो कां रे ॥ ॥ १ ॥ यापरती जीवा सोडवण[3] नाहीं. ॥ वेदशास्त्रीं पाहीं भाष्य असे ॥ ॥ २ ॥ पुराणें डांगोणें पिटिती नामाचा ॥ तें तूं कां रे वाचा न वदसी ॥३॥ सायास साधनें नलगे आणीक ॥ एका जनार्दनीं ऐक्य मन करीं ॥ ४ ॥

५८. जन्ममरणाची चूकवा रे खेपा ॥ यासीं तो सोपा राममंत्र ॥ १ ॥ वेळोवेळां वाचे उच्चारावें नाम ॥ तेणें निष्कामें[4] प्राणी होय ॥ २ ॥ सायास नाहीं अनायासें वर्म ॥ वाचें रामनाम आठवावें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नामाविण कांहीं ॥ आणिक थोर नाहीं कलीमाजी ॥ ४ ॥

५९. आह्मीं योग साधियेला ॥ भांगभुरका तो आणिला ॥ १ ॥ योग न कळे तया मूढा ॥ साधन काय तें दगडा ॥ २ ॥ आंत काळा बाहेर काळा ॥ नाम नाहीं अमंगळा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ते पामर ॥ साधन साधिती ते खर ॥ ४ ॥

---

१ चिरकाल न राहणारा. २ खाणें. ३ सुटका. ४ कोणत्याही प्रकारची इच्छा नसणारा.

६०. नोहे सायास रामनामीं ॥ संसारासी गुंते प्राणी ॥ १ ॥ आठवी वाचे रामनाम ॥ नुरेची संसार श्रम ॥ २ ॥ नको करूं वाया श्रम ॥ वाचे ह्मणें राम राम ॥३॥ आवडीनें नाम घोका ॥ ह्मणे जनार्दनाचा एका ॥४॥

६१. साधन तें साधा वाचे ॥ नाम ह्मणा गोविंदाचें ॥ १ ॥ तेणें तुटेल बंधन ॥ वाचे गातां रामकृष्ण ॥ २ ॥ नामा सरसी वाजे टाळी ॥ महापापा होय होळी ॥ ३ ॥ हा तो पुराणीं निश्चय ॥ नाम निशिदिनीं गाय ॥ ४ ॥ आवडीनें नाम गाय ॥ एका जनार्दनीं वंदी पाय ॥ ५ ॥

६२. आली आषाढी जाये पंढरीसी ॥ चित्त पायापाशीं विठोबाच्या ॥ १ ॥ वैष्णव गर्जती नामामृत सार ॥ फुटतसे पाझर कामक्रोधा ॥ २ ॥ एका जनार्दनीं धरुनी विश्वास ॥ जाये पंढरीसी होय संताचा दास ॥३॥

६३. लज्जा अभिमान[2] टाकुनी परता ॥ परमार्थ सरता करीं कां रे ॥१॥ वादक निंदक भेदक ऐसे त्रिविध ॥ याचा टाकुनी भेद भजन करी ॥२॥ एका जनार्दनीं त्रिविधा परता ॥ होउनी परमाथा हित करी ॥ ३ ॥

६४. वासुदेवस्मरणें तुटती जन्ममरणव्याधी ॥ अहं सोऽहं कोऽहं मूळ ह्या सांडी उपाधी ॥ १ ॥ रामकृष्ण वासुदेव गोपाळ वाचे आठवा ॥ जन्म जरा तुटे वाचे आठवितां सांठवा ॥ २ ॥ चिपळ्या टाळ घुळघुळा शब्दनादें ॥ तेणें ब्रह्मानंद हृदयीं आठवण नांदे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वासुदेव चिंतितां ॥ यमकाळदूत पळती नाम ऐकतां ॥ ४ ॥

६५. जया परमार्थीं चाड ॥ तेणें सांडावें लिगांड[3] ॥ धरुनी भजनासी चाड ॥ नित्य नेम आदरें ॥ १ ॥ सांडीमांडी परती टाकीं ॥ वासुदेव नाम घोकीं ॥ मोक्ष येईल सुखी ॥ नाम स्मरतां आदरें ॥ २ ॥ रामकृष्ण वासुदेव ॥ धरीं हाचि दृढ भाव ॥ आणिकाचा हेवा[4] ॥ दुरी करीं आदरें ॥ ३ ॥ घाली संतासी आसन ॥ पूजा करीं काया वाचा मनें ॥ एका जनार्दनीं जाण ॥ इच्छिलें तें पुरवी ॥ ४ ॥

६६. घालीं देवावरी भार ॥ आणिक न करीं विचार ॥ योग क्षेम निर्धार ॥ चालवील तुझा ॥ १ ॥ वाचें गाय नामावळी[5] ॥ वासुदेवीं वाहीं

---

१ झरा. २ अहंकार. ३ लचांड. ४ दुष्टपणा. ५ नांवांच्या पंक्ती..

टाळी ॥ प्रेमाचे कल्लोळीं ॥ नित्यानंदें सर्वथा ॥ २ ॥ सोस घेई कां रे वाचे ॥ रामकृष्ण वदतां साचें ॥ धरणें उठतें यमाचें ॥ निःसंदेह ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं ॥ करी रामनामध्वनी ॥ कैवल्याचा दानी ॥ रक्षी तुज निर्धारें ॥ ४ ॥

६७. तूं ह्मणशील बा हें माझें माझें ॥ वांया वाहासी वोउगें[2] ओझें ॥ १ ॥ सोडीं दे टाकुनी परता येईं ॥ रामनाम वाचे सदा गाईं ॥ २ ॥ नामची जाण सत्य सार ॥ वांया कां वाहाशील भार ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम सार ॥ वेदशास्त्रीं हा निर्धार ॥ ४ ॥

६८. उघडा हा मंत्र विठ्ठल वदे वाचे ॥ अनंत जन्मांचे दोष जाती ॥ १ ॥ न करीं आळस आलीया संसारीं ॥ वदें निरंतरीं विठ्ठलनाम ॥ २ ॥ साधती साधन तुटती बंधन ॥ विठ्ठल नाम जाण जप करीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आसनीं शयनीं ॥ विठ्ठल निशिदिनीं जप करीं ॥ ४ ॥

६९. येणें पंथें[3] बहुत तरले निश्चिती ॥ आवडी जे गाती विठोबासी ॥ १ ॥ तारक हा मंत्र सोपा पैं सर्वांसीं ॥ उच्चारितां अहर्निशीं सर्व सिद्ध ॥ २ ॥ पापा प्रायश्चित्त कलियुगीं नाम ॥ आणिक सोपें धर्म संतसेवा ॥ ३ ॥ नलगे दंडन मुंडन दे आटी ॥ नाम घेतां होटीं सव जोडे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं संतांसी शरण ॥ चुके जन्ममरण नाना पीडा ॥ ५ ॥

७०. धन दारा पुत्र अपत्य हें ह्मणसी माझें ॥ परी हें काळाचें खाजें जाणें बापा ॥ १ ॥ गंगेलागीं पूर अवचिंत[4] आला ॥ लोटोनीया गेला मागुती जैसा ॥ २ ॥ तैसा याचा विश्वास न धरीं तूं मनी ॥ यमाची जांचणी तुजसी होय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सोडोनी देईं संग ॥ नाम तूं अभंग हरीचें वदें ॥ ४ ॥

७१. धांवूं नको सैरा कर्माचिया पाटी ॥ तेणें होय दृष्टि उफराटी ॥ १ ॥ शुद्ध अशुद्धाच्या न पडे वेवांदा[5] ॥ वाचें ह्मणे सदा नारायण ॥२॥ एकाजनार्दनीं ब्रह्मार्पण कम ॥ तेणें अवघे धर्म जोडतील ॥ ३ ॥

---

१ निःसंशय. २ उगीच. ३ मार्गानें. ४ एकदम. ५ वाद करण्याला.

७२. जाणोनिया वेडा होसी कां गव्हरा ॥ भजें तूं पामरा श्रीविठ्ठला ॥ १ ॥ नको रे साधन व्युत्पत्तीचा भार ॥ चुकवी वेरझार विठ्ठलनामें ॥ २ ॥ एका जनार्दनी विठ्ठलावांचुनी ॥ सोडविता कोणी नाहीं दुजा ॥ ३ ॥

७३. काय जाणो विधी ॥ निषधाचे ते बुद्धि ॥ १ ॥ आह्मी गाऊं नाम मुखें ॥ नाचूं सुखें कीर्तनीं ॥ २ ॥ न पडो भलतीया भरीं ॥ वाचे ह्मणा हरिहरि ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण ॥ विधिनिषेध गेला पूर्ण ॥ ४ ॥

७४. साधकासी साधतां ज्ञान ॥ तंव आडवें येत मायाविघ्न ॥ १ ॥ ह्मणोनी करा हरिचिंतन ॥ तेणें तुटे भवबंधन ॥ २ ॥ सांडीं सांडीं थोरपण ॥ व्हावें लीनें कीर्तनीं ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं ॥ सांडा अभिमान संतजनीं ॥ ४ ॥

७५. उगम संगम प्रवाह गती ॥ ऐशी त्रिविध देहस्थिति ॥ १ ॥ बालत्व तारुण्य वृद्धत्व ॥ ऐसें देहाचें त्रिविधत्व ॥२॥ जरा मरण नाश पावे ॥ ऐसा देह व्यर्थ जाये ॥३॥ ऐसीयाचा भरंवसा ॥ एका जनार्दनीं ठसा ॥४॥

७६. विधिनिषेध कवणेपरी ॥ कार्याकारण ते परी ॥ १ ॥ नाम जपतां सादर ॥ विधिनिषेध पळे दूर ॥ २ ॥ व्रत करा एकादशी ॥ कंठीं मिरवा तुळसी ॥ ३ ॥ करा घोष हरिकथा ॥ विधिनिषेध वंदिल माथा ॥ ४ ॥ एकपणें जनार्दनें ॥ एका विधिनिषेध नेणें ॥ ५ ॥

७७. बुडालीया जळीं धांवतसे कोण ॥ तैसे प्राणी जन बुडताती ॥१॥ संसार हा डोहो दुस्तर[2] पारखा ॥ सांगड[3] ती देखा रामनाम ॥ २ ॥ एका जनार्दनीं संताचा आधार ॥ उतरूं पैलपार भवडोहीं ॥ ३ ॥

७८. कष्ट न करितां योग जरी साधे ॥ श्रम ते उपाधि वाउगी कां वा ॥ १ ॥ नाम तें सोपें श्रम नाहीं कांहीं ॥ उच्चारितां पाहीं सर्व जोडे ॥ २ ॥ एका जनार्दनीं नका योगयाग ॥ ह्मणावा श्रीरंग वाचे सदा ॥ ३ ॥

७९. अभिमान नको धरूं पोटीं ॥ होय अर्थासवें तुटी ॥ १ ॥ ह्मणोनी स्मरा राम राम ॥ तेणें पावाल निजधाम[4] ॥ २ ॥ विहित करा

१ नम्र. २ तरून जाण्यास अशक्य. ३ पोहून जाण्याचें साधन. ४ आपली जागा.

आपुलें कांहीं ॥ आठवा वाचे राम देहीं ॥ ३ ॥ काकुलती येतां जना ॥ शरण एकाजनार्दना ॥ ४ ॥

८०. नित्य ध्यातां हरीचे चरण ॥ करी भक्तदुःख हरण ॥ १ ॥ चरण-[1]रज पवित्रता ॥ सदा ध्यावेंचि माथां ॥ २ ॥ लागला पाषाणीं[2] चरण ॥ ती स्त्रीच झाली पावन ॥३॥ ऐसें चरणींचें मान ॥ शरण एका जनार्दन ॥४॥

८१. मागें बहुतां गणा आलें ॥ रामनाम रसायन चांगलें ॥ १ ॥ बहुतीं सेविलें आदरें ॥ तेणें तरले भवसागर ॥ २ ॥ शुकें उतरिलें निगुती ॥ दिधलें असे परीक्षिती ॥ ३ ॥ सेवितां आरोग्य झाला ॥ एका जनार्दनीं ह्मणे भला ॥ ४ ॥

८२. वोखद[3] घेतलीया पाठीं ॥ तेणें रोगा होय तुटी ॥ १ ॥ पथ्य साचार साचार ॥ नामीं धरा निर्धार ॥ २ ॥ वोखदासी कारण पथ्य ॥ भव रोगीया रामनामें मुक्त ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं करा ॥ श्रीराम राम उच्चारा ॥४॥

८३. ज्ञान ध्यान वर्म शाब्दिक कवित्व ॥ हें तो न कळे अर्थ मूढाप्रती ॥ १ ॥ राम मुखें गावा राम मुखें गावा ॥ वाचे आठवावा कृष्ण सदा ॥२॥ एका जनार्दनीं रामकृष्ण मनीं ॥ भजा आसनीं शयनीं सर्वकाळ ॥३॥

८४ अवचट मुखीं ह्मणता राम राम ॥ सर्व दुरितें[4] होती भस्म ॥ १ ॥ नामापुढें पाप राहे ॥ ऐसा कोण वदताहे ॥२॥ घडतां पातकांच्या राशी ॥ तोही नेला वैकुंठासी ॥ ३ ॥ भाविकांसी वर्म सोपें ॥ राम मुखें जपावें ॥ ४ ॥ जनीं वनीं निरंजनीं ॥ शरण एका जनार्दनीं ॥ ५ ॥

८५. भावें करावें भजन ॥ भावें करा नामस्मरण ॥ १ ॥ भावें जावें पंढरीसी ॥ भावें नाहावें भीमरथीसी[5] ॥ २ ॥ भावें करा प्रदक्षिणा ॥ भावें करा जागरण ॥ ३ ॥ भावें व्रत एकादशी ॥ शरण एका जनार्दनासी ॥४॥

८६. जग राम राम ह्मणे ॥ तया कां न येती विमानें ॥ १ ॥ नवल स्मरणाची ठेव ॥ नामीं नाहीं अनुभव ॥ २ ॥ नष्ट गणिका राम ह्मणे ॥ तिसी वैकुंठीचें पेणें ॥३॥ एका जनार्दनीं ध्यात ॥ राम पाहे ध्याना आंत ॥ ४॥

८७. रुक्मांगदा कारणें एकादशीचा छंद ॥ तेणें परमानंद प्रगटला ॥ १ ॥ अंबऋषी कारणें द्वादशीचा छंद ॥ तेणें परमानंद प्रगटला ॥ २ ॥

---

१ पायांची धूळ. २ दगडाला, ३ औषध. ४ पातकें. ५ भागीरथीस.

प्रल्हादाकारणें हरिनामाचा छंद ॥ तेणें परमानंद प्रगटला ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकविध छंद ॥ तेणें परमानंद प्रगटला ॥ ४ ॥

८८. नाम घेतां हें वैखरी ॥ चित्त धांवे विषयावरी ॥ १ ॥ कैसें होताहे स्मरण ॥ स्मरणामाजी विस्मरण ॥ २ ॥ नामरूपा नव्हता मेळ ॥ नुसता वाचेचा गोंधळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं छंद ॥ बोलामाजी परमानंद ॥४॥

८९. पाहूं गेलीये हरिजागरा ॥ नयनें[1] लाचावले नंदकुमारा ॥ १ ॥ कान्हयारे मनमोहना[2] ॥ देहगेहाची तुटली वासना ॥ २ ॥ आदरें आवडी ऐकतां नाम ॥ नाममात्रें झालों निष्काम ॥३॥ एकाजनार्दनीं हरीकीर्तन ॥ समाधीसी तेथें समाधान ॥ ४ ॥

९०. विचारितां तुज नामचि नसे ॥ नामरूपीं तुझें स्वरूपचि भासे ॥ १ ॥ नामीं अनामता पावुनी पठन ॥ यापरी स्मरीजे या नामस्मरण ॥ २ ॥ गर्जतां नामीं जो जो शब्द उठी ॥ शब्दनिःशब्दां पडतसे मिठी ॥३॥ एका जनार्दन नित्य स्मरे नाम ॥ नामरूप स्वयें झाला आत्माराम ॥४॥

९१. जन्म कर्म अवघें व्यर्थ ॥ विवेकी घेती अर्थ ॥ १ ॥ हरि हाची धर्म मुख्य ॥ रामकृष्ण उच्चारी मुख ॥ २ ॥ दिन जाऊं नेदी वाउगा जाण ॥ काळाचें जनन राम कृष्ण ॥३॥ एका जनार्दनीं जन्म कर्म धर्म ॥ ब्रह्मार्पण वर्म हेंचि खरें ॥ ४ ॥

९२. हरिस्मरणीं सावध व्हावें ॥ स्वहित आपुलें विचारावें ॥ १ ॥ तरला प्रल्हाद आणि धुरू[3] ॥ उपमन्या क्षीरसागरू ॥ २ ॥ एका जनार्दनीं छंद ॥ अवघा[4] भरला श्रीगोविंद ॥ ३ ॥

९३. गोड साखरसें गोड साखरसें ॥ रामनामरसें चवी आली ॥ धृ० ॥ देठींचें फळ देठीं पीके ॥ रान तोडितां चवी चाखे ॥ गोड० ॥ १ ॥ न फोडी न तोडी सगळेंचि सेवी ॥ ब्रह्मादिकां तो वांकुल्या[5] दावी ॥ गोड० ॥ २ ॥ एका जनार्दनीं घेतली गोडी ॥ जीव गेल्या तरी न मी सोडी ॥ गोड० ॥ ३ ॥

९४. सांडीं परापवाद खोडी ॥ घेईं विठ्ठल स्वरूपीं गोडी ॥ १ ॥ व्यर्थ

---

१ डोळा २ अंतःकरणाला मोह पाडणाऱ्या. ३ ध्रुव. ४ पूर्ण. ५ चाळे.

टवाळाचे बोल ॥ बोलूं नका ह्मणा विठ्ठल ॥ २ ॥ विठ्ठल विठ्ठल नेटका ॥ भावें ह्मणतां ब्रह्म फुका ॥ ३ ॥ एका जनार्दनीं साचें ॥ विठ्ठल विठ्ठल ह्मणतां वाचे ॥ ४ ॥

---

## भक्तीविषयीं बोध.

१. अभाग्य[1] न भजती भगवंतीं ॥ त्यांसी पृथ्वी असें जडत्व देती ॥ जळें दिधली त्या अधोगती[2] ॥ तेजें दिधली त्या संतापवृत्ती ॥ १ ॥ ऐशा कैसेनी भेटे भगवंतू ॥ नरदेहीं मुकले निजस्वार्थू ॥ जन्ममरणांचे भोगिती आवर्तू ॥ त्यांसी विमुख होय हृदयस्थू ॥ धृ० ॥ २ ॥ वायूनें दिधलें त्या चंचळत्व ॥ नभें दिधलें त्या भावशून्यत्व ॥ महत्तत्त्वें हरिलें निजसत्त्व ॥ मायें दिधलें त्या ममत्व ॥ ३ ॥ सभाग्य भावें भजती भगवंतीं ॥ त्यांसी पृथ्वी देतसे निजशांती ॥ जळें दिधली मधुर[3] रसवृत्ती ॥ तेजें दिधली निज तेज प्रभा दीप्ती ॥ ४ ॥ ऐशा सहजें प्रसन्न होय देवो ॥ जेणें भूतांचा पालटे देहभावो ॥ निजीं निजाचा वाढे निर्वाहो ॥ जनीं विजनीं अखंड ब्रह्मभावो ॥ ५ ॥ वायु उपरमें दे निश्चळत्व ॥ नभें दिधलें त्या अलिप्तत्व ॥ महत्तत्त्वें दिधलें शोधित सत्त्व ॥ मायें दिधलें सद्विद्या परम तत्त्व ॥ ६ ॥ एका जनार्दनीं निज भक्ती ॥ तें अलभ्य[4] लाभु होय प्राप्ती ॥ भूतें महाभूतें प्रसन्न होती ॥ तेणें न भंगे ब्रह्मस्थिति ॥ ७ ॥

२. हरिनाम स्मरतों ह्मणूनी आचरसी दोष ॥ श्रवण स्मरण भक्ति तेणें पडली वोस ॥ १ ॥ हरि नामाचेनि बळें करसी अधर्म ॥ देवाचेनी तुमचें शुद्ध नोहे कर्म ॥ २ ॥ दुर्वासाचेनी कोपें अंबऋषीस शाप ॥ देवाचे चक्रें त्या दिधला संताप ॥ ३ ॥ सत्यव्रती धर्म सत्यनिष्ठ ॥ असत्य वचनीं त्याचा झडला अंगुष्ठ[5] ॥ ४ ॥ निष्पाप मांडव्य शुळीं वाइला ॥ इतुकियास्तव यम दासीपुत्र केला ॥ ५ ॥ एका जनार्दनीं संत सोईनें चाले ॥ सद्गुरुवचनें सबाह्य शुद्ध झालें ॥ ६ ॥

---

१ भाग्यहीन. २ नरकवास. ३ गोड. ४ प्राप्त होण्यास अशक्य. ५ आंगठा.

३. धन मान बळें नाठविसी देवा ॥ अंतकाळीं तेव्हां कोण आहे ॥१॥ यमाचे ते दंड बैसतील माथां ॥ मग तुज रक्षिता कोण आहे ॥ २ ॥ माता पिता बंधु सोइरे धाइरे ॥ जोंवरी इंद्रियें चालताती ॥ ३ ॥ सर्वस्व कामिनी ह्मणवीसी कांता ॥ तीही केश देता रडूं लागे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं जातांची शरण ॥ स्वप्नीं जन्म मरण नाहीं नाहीं ॥ ५ ॥

४. संतजनाची मिळाली मिळवणी ॥ रामनामाची भरली भरणी ॥१॥ रामनाम सेवा हा राम सांठवा ॥ परमानंदाचा लाभ झाला जीवा ॥ २॥ कीर्तनाचें तारूं लाधलें ॥ रामनाम कोणें सवंगलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रामनाम सेवा ॥ परमानंदाचा लाभ झाला जीवा ॥ ४ ॥

५. भक्ति नाहीं नामीं तो चांडाळ पतित ॥ तोची जाणावा कुत्सित नष्ट येथें ॥ १ ॥ प्रपंच[1]कर्दमीं बुडोनीयां ठेले ॥ संताविण उगले फजीत होती ॥ २ ॥ पुत्र मित्र कांता मानुनी भरंवसा ॥ याचा मोह फांसा जन्मवरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अंतीं आहे कोण ॥ न कळे संताविण निश्चयेंसी ॥ ४ ॥

६. [2]बधिर जाले पैं [3]श्रवणें ॥ झाले दंत उन्मळण ॥ १ ॥ अजूनी काय धरिसी माया ॥ गेलीं इंद्रियें विलया ॥ २ ॥ नाकीं श्लेष्माचा खळ्ळाळ ॥ तोंडावाटे पडे लाळ ॥ ३ ॥ टर फुस वाजे गुदद्वार ॥ चरणीं सांडिला व्यापार ॥ ४ ॥ वृषण आलें गुडघ्यावरी ॥ शिश्न लोंबे पीठ चाचरी ॥ ५॥ कफ वात पैं सुटला ॥ शरीर कांपे चळचळा ॥ ६ ॥ लहान थोर ते हांसती ॥ फे फे वांकुल्या दाविती ॥ ७ ॥ वागतां चाचरडे भिंती ॥ पोरें बाऊ ह्मणोनी पळती ॥ ८ ॥ भार्या केली रे आवडी ॥ ती तुजवर बोटें मोडी ॥ ९ ॥ स्त्रीये पाहिजे पुरुषभोग ॥ तुज लागला खोकला रोग ॥१०॥ तुज जाणे निरयाकडे ॥ ती काजळ कुंका रडे ॥ ११ ॥ प्राण आला डोळियांसी ॥ कैसा स्वार्थ न संडिसी ॥ १२ ॥ आंगण झालें रे विदेश ॥ किती करिसी विषयसोस ॥ १३ ॥ आप्त ह्मणती कां मरेना ॥ पालटु झाला याचिया चिन्हा ॥१४॥ एका जनार्दनीं निष्काम ॥ भजा भजा रे परब्रह्म ॥१५॥

---

१ संसाररूपी चिखलांत. २ बहिरे. ३ कान. ४ नाशाला. ५ विषयाची इच्छा.

७. अगाध चरणाचें महिमान ॥ वानितां वेदां पडिलें मौन्य ॥ १ ॥ पुराणें वर्णितां भागलीं ॥ सहा शास्त्रें वेडावलीं ॥ २ ॥ तें पुंडलीकाचे लोभें ॥ एका जनार्दनीं विटे उभें ॥ ३ ॥

८. वचनमात्रासाठीं ॥ प्रगटला कोरडे काष्ठीं ॥१॥ ऐसी कृपाळु माउली ॥ भक्तासाठीं धांव घाली ॥ २ ॥ तो हा कृपेचा कोंवळा ॥ राखे भक्ताचा तो लळा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं डोळा ॥ पहा विठ्ठल सांवळा ॥ ४ ॥

९. साखरेची गोडी साखर सांडुनी उभी उघडी ॥ तैसें आयुष्य जोडिलें जोडी नरदेहा ॥ १ ॥ मोतीयाचें आवदानें घालिताती अंगीं ॥ भोगावया लागीं विषयसुख ॥ २ ॥ गेलें बापा हित हातोहातीं ॥ पुढें आली राती काळवंखी ॥ ३ ॥ आयुष्याच्या शेवटीं सुखाची या गोष्टी ॥ काळानळा पोटीं पडसील बापा ॥ ४ ॥ सोलीव[१] सुकृत[२] भरूनिया मापा ॥ विषयासाठीं पाहें पां लावितोसी ॥ ५ ॥ अमृत जोडोनी सायासीं गळीं कां लावितोसी ॥ घालुनी मत्स्यासी कवण काज ॥ ६ ॥ मिनली चिंतामणीचा शिळा घोटिव चौबळा ॥ कां रे नेउनी पायातळा रचितोसी ॥ ७ ॥ तेथें जें जें कांहीं चिंतिसी तें अधिकची पावसी ॥ नरकाची चौपासी वाढविली ॥ ८ ॥ कल्पतरु देखोनी डोळा उभा राहुनी तया तळा ॥ ह्मणसी मरमर निर्फळा काय करूं ॥ ९ ॥ तेथें मरमर उच्चारिलें मरणची अधिक झालें ॥ तुझिया कल्पना केलें वैर तुज ॥१०॥ येवोनी ये जनीं जन्म उत्तम योनी ॥ कां रे भजन नारायणीं चुकलासी ॥ ११ ॥ जंववरी आयुष्य आहे तंववरी हिताची सोये ॥ एका जनार्दनीं शरण जाये एकपणें ॥ १२ ॥

१०. फुल झडे तंव फळ पोसे ॥ तया पाठीं तेंही नासे ॥ १ ॥ एक मागें एक पुढें ॥ मरण विसरलें बापुडें ॥ २ ॥ शेजारी निमाले[४] कोणाचे खांदीं ॥ लपों गेला सापें खादली मांदी ॥ ३ ॥ मरण ऐकतां परता पळे ॥ पळे तोही मसणीं जळे ॥४॥ प्रेत देखोनीं वोझ्याच्या जाती ॥ वोझें ह्मणती तेही मरती ॥ ५ ॥ मरण ह्मणतां थूं थूं ह्मणती ॥ थुंकते[५] तोंडें मसणीं ज-

---

१ लाकडांत. २ चांगलें. ३ पुण्य. ४ मरण पावले. ५ थुंकणारे.

ळती ॥६॥ पळेना चळे तोचि सांपडे ॥ जाणतां जाणतां होताती वेडे॥७॥ एका जनार्दनीं शरण ॥ काळ वेळ तेथें न रिघे मरण ॥ ८ ॥

११. एकाची माहेरा नाथिली ॥ हे तंव जाण भ्रांति बोली ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल रोकडा ॥ विठ्ठल पाहे चहूं कडा ॥ २ ॥ आपण आंत बाहेरीं पाहे ॥ विठ्ठल देखोनी उगाची राहे ॥ ३ ॥ एका जनार्दना शरण ॥ विठ्ठल विठ्ठल परिपूर्ण ॥ ४ ॥

१२. व्यापुनीयां भरला देव ॥ रिता ठाव कोठें पा ॥ १ ॥ तयाचें करारे चिंतन ॥ मग तुह्मां न पडे न्यून[1] ॥ २ ॥ वाचें वदा विठ्ठल साचा ॥ सोइरा साचा अंतकाळीं[2] ॥३॥ मागें पुढें उभा असे ॥ एका जनार्दनीं दिसे ॥४॥

१३. विषयीं होउनी उदास ॥ सांडा संसाराचीं आस ॥ १ ॥ तरीच पावाल शरण ॥ संत सेवा घडेल जाण ॥ २ ॥ होऊन उदासवृत्ती ॥ भजन करा दिनरातीं ॥ ३ ॥ ऐसी आवड धरा मनीं ॥ शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

१४. मातेचा आठव बाळावरी स्नेहो ॥ तैसा धरा देवो मनीं सदा ॥१॥ बाळा पाहुनीयां माता संतोषत ॥ तैसी धरा हेत देवावरी ॥ २ ॥ बोबडें साबडें असोच तें बाळ ॥ तैसा धरा कळवळ देवावरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देव धरा मनीं ॥ आसनीं शयनीं विसरूं नका ॥ ४ ॥

१५. वत्सालागीं गोप धाउनी वोरसे ॥ तैसें असो पिसें देवा ठाईं ॥१॥ पाडसा[3] चुकली हरीण पाहे वास ॥ तैसा धरा आस देवा ठाईं ॥ २ ॥ मातेलागीं चुके बाळ एकुलतें ॥ तैसें देवापरतें न धरा मनीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देव करा सखा ॥ प्रपंच पारिखा सहज तेणें ॥ ४ ॥

१६. जरा[4] पावली निज संधी ॥ अनिवार येती आधिव्याधी ॥ १ ॥ पायीं पडतसे वेंगडी[5] ॥ अंधारीं धरणें लागे काठी ॥ २ ॥ डोळां चिपडें तोंडा लाळ ॥ नाका येत शेंबूड वोंगळ ॥ ३ ॥ चुंबन देतां पोराप्रती ॥ बाऊ ह्मणोनी पोरें पळती ॥ ४ ॥ ऐशी दशा येईल अंगा ॥ एका जनार्दनीं शरण रिगा ॥ ५ ॥

---

१ कमी. २ मरणाच्या वेळीं. ३ हरिणाचें पोर. ४ म्हातारपण. ५ वांकडेपणा.

१७. डोळा फोडोनी काजळ ल्याला ॥ नाक कापुन शिमगा खेळला ॥१॥ वेंचितां धन लक्ष कोटी ॥ आयुष्य क्षणचि नोहे भेटी ॥ २ ॥ मिथ्या बागुलाचा भेंवो ॥ बाळें सत्य मानिती पहा हो ॥ ३ ॥ ऐसें मिथ्या नको मनीं ॥ एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

१८. नित्य नूतन[2] दीप ज्वाळा ॥ होती जाती देखती डोळा ॥ १ ॥ जागृती आणि देखती स्वप्न ॥ दोहीं देखतां भिन्न भिन्न ॥ २ ॥ भिन्नपणें[3] नका पाहूं ॥ एका जनार्दनीं पाहूं ॥ ३ ॥

१९. मजुर राउताचें घृत नेतां ॥ तो तुरंगीं चढे मनोरथा ॥ १ ॥ सबळ वारुवांचें उड्डाण ॥ ह्मणोनी उडों जात आपण ॥ २ ॥ बळें उडाला माझा घोडा ॥ परी स्मरण नाहीं धगडा ॥ ३ ॥ उडी सारखी घागरी पडे ॥ एका जनार्दनीं पाहुनी रडे ॥ ४ ॥

२०. ऐसें लागलीया ध्यान ॥ अंतकाळीं ठसावें मन ॥ १ ॥ ह्मणोनि भोगक्षयें जाण ॥ मागील देहाचें अनुसंधान ॥ २ ॥ मागील सांडीं रे दगडा ॥ कां घालिसी पाय खोडां ॥ ३ ॥ भुलोनी जाऊं नको वायां ॥ एका जनार्दनीं लागे पायां ॥ ४ ॥

२१. घटामाजी घालिजे अमृत ॥ अथवा घालिजे खात मूत ॥ १ ॥ घट घाई करितां चूर ॥ आकाशासी नुमटे चीरें[4] ॥ २ ॥ घट फोडोनी केला नाश ॥ आकाश तैसेंची अविनाश ॥ ३ ॥ तेवीं देह नश्वरें[5] जाण ॥ एका जनार्दनीं परिपूर्ण ॥ ४ ॥

२२. एक ह्मणती आत्मा सगुण ॥ एक ह्मणताती निर्गुण ॥ १ ॥ एक प्रतिपादिती भेद ॥ एक प्रतिपादितसे अभेद ॥ २ ॥ एक ह्मणती मिथ्या भूत ॥ प्रत्यक्ष दिसत जो येथ ॥ ३ ॥ ऐसे नाना भेद वाद सकल ॥ विचारितां अज्ञान मुळ ॥४॥ अज्ञान तें मिथ्या जाणा ॥ शरण एका जनार्दना ५

२३. प्रकाश भासे सर्पाकार ॥ सर्प नसोनी जेवीं दोर ॥ १ ॥ कृष्ण वर्ण रक्त श्वेत ॥ स्फटिकीं जेवीं भासत ॥ २ ॥ ऐशी त्रिगुणाची मिळणी ॥ शरण एका जनार्दनीं ॥ ३ ॥

---

१ खर्च करितां २ नवीन. ३ निराळेपणानें. ४ भेग. ५ नाशवंत.

२४. आकाशापासोनी वायु झाला ॥ तो गगना वेगळा नाहीं गेला ॥ १ ॥ अग्नीपासुनी जळाचा अंशू ॥ जळापासुनी पृथ्वी प्रकाशू ॥ २ ॥ तैसें कार्य आणि कारण ॥ परस्परें अभिन्न जाण ॥ ३ ॥ जेवीं तंतु आणि पट्टू[1] ॥ दोन्ही दिसती एकवटू[2] ॥ ४ ॥ साखरेचे नारळ केले ॥ परी साखरत्वा नाहीं मुकले ॥ ५ ॥ जेवीं कां पृथ्वी मृत्तिका ॥ मृत्तिकेचें भांडें देखा ॥ ६ ॥ ऐसें कार्य कारण विशेष ॥ एका जनार्दनीं निज दास ॥ ७ ॥

२५. दर्पणामाजीं[3] आपण ॥ जीवरूपें शिव जाण ॥ १ ॥ जेणें स्वरूपें आपण ॥ तद्रूप बिंब दिसे जाण ॥ २ ॥ अग्नि राखें झांकोळिला ॥ तरी अग्निपणें संचला ॥ ३ ॥ जीव शिव दोन्ही हो कां एक ॥ तरी एक मलीन एक चोख ॥ ४ ॥ थिल्लरीं प्रतिबिंब भासे ॥ बिंबा अंगीं काय संचित वसे ॥ ५ ॥ निर्वाळुनी पहातां वेगीं ॥ बिंब प्रतिबिंब वाउगी ॥ ६ ॥ ऐसें भुलूं नये मन ॥ शरण एका जनार्दन ॥ ७ ॥

२६. साधक सर्वदा पुसती ॥ कोण बाधा चित्तवृत्ती ॥ १ ॥ एकचि गुण जैं पुरता जोडे ॥ तैं एकविधा वृत्ति वाढे ॥ २ ॥ एकचि न जोडे गुणावस्था ॥ यालागीं नोहे एकविधता ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूर्ण ॥ चित्त चैतन्य संपूर्ण ॥ ४ ॥

२७. देहशत्रु वसती दूर देशीं ॥ येतां बहु दिवस लागती तयांसी ॥ १ ॥ बाह्य शत्रूंचें अल्प दुःख ॥ मन शत्रूचें वर्म अशेष ॥ २ ॥ आसनीं शयनीं एकांतीं ॥ जपीं अथवा ध्यानस्थितीं ॥ ३ ॥ ऐशिया मनातें न जिंकितां ॥ देवपण नये हाता ॥ ४ ॥ देवपणाचे भुलले हावे ॥ एका जनार्दनीं नेणती देवे ॥ ५ ॥

२८. देह सांडावा ना मांडावा ॥ येणे परमार्थुची साधावा ॥ ॥ १ ॥ जेणें देहीं वाढे भावो ॥ देहीं दिसतसे देवो ॥ २ ॥ ऐसें देहें भजन घडे ॥ त्रिगुणात्मक स्वयें उडे ॥ ३ ॥ त्रिगुणात्मक देहो वावो ॥ एका जनार्दनीं धरा भावो ॥ ४ ॥

---

१ वस्त्र. २ एकसारखें. ३ आरशामध्यें. ४ झांकला. ५ पाण्याच्या डबक्यांत.

२९. काळें काळ वायां जातू ॥ तेणें होये आयुष्य अंतू ॥ १ ॥ जाणोनियां रक्षी कोण ॥ सांडी देहाचा अभिमान ॥ २ ॥ अभिमान सांडोनी झडकरी ॥ एका जनार्दनीं दास्य करी ॥ ३ ॥

३०. भावें करितां माझी भक्ती ॥ विषयवासना जळोनी जाती ॥ १ ॥ चालतां माझे भक्तिपंथीं ॥ सकळ साधनें जळोनी जाती ॥ २ ॥ माझीया निज भक्ता ॥ न बाधेचि संसारव्यथा ॥ ३ ॥ प्रल्हादा गांजितां जगजेठी ॥ मी प्रगटलों कोरडे काष्टीं ॥ ४ ॥ द्रौपदी गांजितां तात्काळीं ॥ कौरवांचीं तोंडें केलीं काळीं ॥ ५ ॥ गोकुळीं गांजितां सुरपती ॥ गोवर्धन धरिला हातीं ॥ ६ ॥ अर्जुन प्रतिज्ञेचे वेळीं ॥ म्यां लपविला हेळी ॥ ७ ॥ अंबऋषीचे गर्भवास ॥ म्यां सोसिले सावकाश ॥ ८ ॥ भक्तचरणींची माती ॥ एका जनार्दनीं वंदिती ॥ ९ ॥

३१. सम साम्य सर्वां भूतीं ॥ ज्यांसी घडे भगवद्भक्ती ॥ १ ॥ जालीया सद्गुरुकृपा ॥ सर्व मार्ग होय सोपा ॥ २ ॥ हृदयीं ठसतांची भावो ॥ प्रगटे देवाधिदेवो ॥ ३ ॥ भक्तां भावार्थें विकला ॥ एका जनार्दनीं देखिला ॥४॥

३२. देह भोगीतसे मुख्य गोडी ॥ स्त्री भोगतो आवडी ॥ १ ॥ स्त्री हातीं धरितां देख ॥ वाढे प्रपंचाचें दुःख ॥ २ ॥ जें जें आणी तें तें थोडें ॥ धन धान्य आवडे कुडें ॥ ३ ॥ ऐसा भुलला संसारा ॥ लक्ष चौऱ्यांशीं वेरझारा ॥ ४ ॥ सोडविता नाहीं कोणी ॥ एका जनार्दनावांचुनी ॥ ५ ॥

३३ मस्तकीं केश चिकटले होती ॥ जैं ते निघती आपुले हातीं ॥ १ ॥ मिळती जैशा माय बहिणी ॥ हातीं घेउनी तेल फणी ॥ २ ॥ ऐसा त्रिगुणाचा ठावो ॥ एका जनार्दनीं पहा वो ॥ ३ ॥

३४. सर्पें धांवोनी धरिल्या तोंडीं ॥ सर्वांगा घालितसे वेढी ॥ १ ॥ सर्पबाधेचां सांकडीं ॥ निवारी मंत्रवादी गारुडी ॥ २ ॥ रिघतां सद्गुरूसी शरण ॥ जैसें निरसे जन्म मरण ॥ ३ ॥ संसारसर्प मिथ्या देहीं ॥ एका जनार्दनीं सदा ध्याई ॥ ४ ॥

३५. एका पाठीं एक पुढा ॥ आहे मरणाचा हुडा ॥ १ ॥ आज मेले

---

१ भक्तिमार्गीत. २ सूर्य. ३ द्रव्य. ४ संकटांत. ५ नाश होई.

उद्यां मरती ॥ मागे राहाती तेही रडती ॥ २ ॥ मरण जाणोनीया पाही ॥ उगेच बोलती प्रवाहीं ॥ ३ ॥ ऐसी भुली पडली देखा ॥ एका जनार्दनीं भुलले ऐका ॥ ४ ॥

३६. व्याही जांवयाच्या[1] कोडी ॥ पोषितसे अति आवडी ॥ १ ॥ देह सुखाचीया चाडा ॥ अवघे मेळविले वोढा ॥ २ ॥ देहीं वाढवी अति प्रीती ॥ पुत्र दारा माझे ह्मणती ॥ ३ ॥ जैसा जोंधळा कणा चढे ॥ कणभारें क्षितीं पडे ॥ ४ ॥ वृक्षा फळें येती अपारें[2] ॥ वृक्ष लवे फळभारें ॥ ५ ॥ ऐसा भुलला स्वजनासी ॥ एका जनार्दनीं सायासीं ॥ ६ ॥

३७. मनुष्यदेहीं व्हावें ब्रह्मज्ञान ॥ घेतो पुढिलें आमंत्रण ॥ १ ॥ पुढें जन्माचा विसार ॥ घेतो अतिमानें तो पामर ॥ २ ॥ चौऱ्यांशी लक्ष योनी प्रती ॥ कोटी कोटी फेरे होती ॥ ३ ॥ ऐसा मनुष्यदेह पावन ॥ तो वेंची विषया कारण ॥ ४ ॥ होतां विषयीं वासना ॥ नाठवीची जनार्दना ॥ ५ ॥

३८. घरीं धन धान्य पुरून ॥ सदा मागे जो कोरान्न ॥ १ ॥ द्रव्य असोनी नाहीं ह्मणे ॥ केविलवाणें ह्मणे मी दीन ॥ २ ॥ असोनी द्रव्याचिया राशी ॥ भिक्षा मागे अहर्निशीं ॥ ३ ॥ ऐसा संचय करून ॥ सवेंची पावला मरण ॥ ४ ॥ वांया गेला नर देही ॥ एका जनार्दनीं पाहीं ॥ ५ ॥

३९. कवडी कवडी घाली खांचे ॥ नित्य नूतन भिक्षा वाचे ॥ १ ॥ अतितासी दान ॥ हें तों स्वप्नीं नाहीं जाण ॥ २ ॥ ज्यासि पर्वकाळविधी ॥ न कळे अभाग्यासी कधीं ॥ ३ ॥ ठेउनि चित्त धनावरी ॥ सवेंची फिरे घरोघरीं ॥ ४ ॥ जन्मा येवोनी अघोर ॥ एका जनार्दनीं भोगिती पामर ॥ ५ ॥

४०. देहो जें पासूनी जाला ॥ तें पासुनी मृत्यु लागला ॥ १ ॥ साप बेडुकातें गिळी ॥ बेडुक मुखें माशी कवळी ॥ २ ॥ ऐसा काळ गिळितो जनां ॥ न कळेचि बुद्धिहीना ॥ ३ ॥ मरण जाणती बापुडीं ॥ धरती प्रपंचीं आवडी ॥ ४ ॥ ऐसे पामर आत्मघाती[5] ॥ यासी महा होय फजिती ॥ ५ ॥ असो जनीं जनार्दन ॥ एका जनार्दनीं शरण ॥ ६ ॥

---

१ समुदाय. २ पुष्कळ. ३ कोरडी भिक्षा. ४ खळग्यांत. ५ आपला घात करणारे.

४१. थोर गर्भींची यातना ॥ आठवितां दुःख मना ॥ १ ॥ नऊ मासवरी ॥ पचे विष्ठेचे दार्थरीं ॥ २ ॥ जन्म होतांची जननी ॥ सुख मानी अनुदिनीं ॥ ३ ॥ बाळ वाढतसे सांयासें ॥ तों तों माउली संतोषे ॥ ४ ॥ तारुण्याच्या येतां भरा ॥ मातेसी करी पाणउतारा ॥ ५ ॥ पावला सर्वे ज्ञातारपण ॥ नाकीं तोंडीं लाळ जाण ॥ ६ ॥ नाठवेची रामनाम ॥ एका जनार्दनीं तो अधम ॥ ७ ॥

४२. कैंचें ध्येय ध्याता ध्यान ॥ अवघें विषयावरी मन ॥ १ ॥ तेथें कैंचें कर्माचरण ॥ सदा विषयींच मन ॥ २ ॥ कैंचा दोष कैंचा गुण ॥ अवघें विषयींच मन ॥ ३ ॥ कैंचा बोध कैंचा भेद ॥ सदा विषयीं तो धुंद ॥ ॥ ४ ॥ ऐसा भुलोनी विषयीं ॥ एका जनार्दनीं बुडे पाही ॥ ५ ॥

४३. समूळ कामनेतें दंडावें ॥ मग शिरादिक मुंडावें ॥ १ ॥ अंतरीं अनिवार कामना ॥ विरक्ति तो दाखवी जना ॥ २ ॥ नाम गर्जतां हे होटीं ॥ एकाजनार्दनीं काम पळे नेहटीं ॥ ३ ॥

४४ स्वप्नामाजीं अनिरुद्धें देखिलीसे उखा ॥ तयालागीं घेउनी गेली चित्ररेखा ॥ १ ॥ तया सोडवण्या हरी ॥ धांव घेतसे झडकरी ॥ २ ॥ पाहे स्वप्नाचेनी कांतें ॥ अनिरुद्धा फेलेंसे निरुतें ॥ ३ ॥ स्वप्नेंची देखे सारा ॥ एका जनार्दनीं पसारा ॥ ४ ॥

४५. आडके कमळिणीकोशीं ॥ भ्रमरू जैसा आमोदासी ॥ १ ॥ तैसा विषया लोधला ॥ रामनामें विवंचला ॥ २ ॥ कोरडें काष्ठ भेदोनी जाये ॥ तो कमळदळीं गुंतला राहे ॥ ३ ॥ ऐसा विषयिक सायासी ॥ एका जनार्दनीं धरी मानसीं ॥ ४ ॥

४६. शिमगीयाचे सणीं ॥ रामकृष्ण न ह्मणे कोणी ॥ १ ॥ महा शब्द उच्चारण ॥ कैसे भुलले अज्ञान ॥ २ ॥ गजरें शब्द करी ॥ एका-जनार्दनीं ह्मणा हरी ॥ ३ ॥

४७. स्नान संध्या शौचाचार ॥ स्वधर्म नावडे साचार ॥ १ ॥ कनक-फळ नाम गोमटें ॥ बाहेर आंत दिसे कांटे ॥ २ ॥ शरीर श्वेत निर्नासिक ॥

---

१ त्रासदायक उबेमध्यें. २ कष्टानें. ३ नाश करावें. ४ भुंगा. ५ सुवासाला.

तोंडाळ ओढाळ पतिनिंदक[1] ॥ ३ ॥ ऐशी आचारहीन बापुडी ॥ एका-जनार्दनीं न धरी गोडी ॥ ४ ॥

४८. भिक्षेलागीं पाणिपात्र ॥ सांठवण उपरमात्र ॥ १ ॥ सायंकाळीं प्रातःकाळासी ॥ भिक्षासंग्रह नसावा निश्चयेंसी ॥ २ ॥ संग्रह यत्नाचिया चाडा ॥ मोहोळ बांधिती अवघा कडा ॥ ३ ॥ मोहोळ झाडितां त्यासी ॥ नाश होतो मासीयांसी ॥ ४ ॥ सर्व मायिक पदार्थ ॥ एका जनार्दनीं परमार्थ ॥ ४ ॥

४९. पांडवांचे गृहीं जाण ॥ असंख्य जेविले ब्राह्मण ॥ धर्माचें विस्मित मन ॥ संख्येलागीं ॥ १ ॥ तें कळलें वैकुंठा ॥ निर्मिली तेव्हां घंटा ॥ तेव्हां ते गर्जे देखा ॥ संख्यानाद ॥ २ ॥ तेथें व्यासदेवाचा सुत ॥ शुकदेव अवधुत ॥ ब्राह्मणशेष व्हावें प्राप्त ॥ ह्मणोनी येता जाहला ॥ ३ ॥ रात्रसमयीं सुखी येकीं ॥ शीत घातलें मुखीं ॥ घंटानाद सकळीकीं ॥ ऐकिला कानीं ॥ ४ ॥ कृष्ण पाहे ध्यानीं ॥ शुकदेव[2] आणिला धुंडोनी ॥ पूजा नमस्कार करुनी ॥ गेलासे वना ॥ ५ ॥ एका जनार्दनीं जाण ॥ धर्मे केला प्रश्न ॥ तोचिं सखा श्रीकृष्ण ॥ सांगतसे ॥ ६ ॥

५०. कोण पारें[3] नेई भवनदींतुनी ॥ सद्गुरूवांचूनि तुह्मालागीं ॥ १ ॥ अनंत उपाय जरी तुह्मीं केले ॥ पार पावविलें नवजाय ॥ २ ॥ नाना तीर्थयात्रा घडल्या तुह्मासी ॥ परि संतोषासी न पावाल ॥ ३ ॥ व्रतें तपें यज्ञें दानें चित्तशुद्धी ॥ परि निजपदीं स्थिर नोहे ॥ ४ ॥ विवेक-वैराग्यबळें सद्गुरुभेटी ॥ आन आटाआटी नलगे कांहीं ॥ ५ ॥ एका जनार्दनीं गुरुचरण धरी ॥ तेथें स्थिर करी मन नरा ॥ ६ ॥

---

## भक्तीचें माहात्म्य.

१. भक्तीचे उदरीं[4] जन्मलें ज्ञान ॥ भक्तीनें ज्ञानासी दिधलें महिमानें[5] ॥ १ ॥ भक्ति तें मूळ ज्ञान तें फळ ॥ वैराग्य केवळ तेथींचें फूल ॥ ॥ २ ॥ फूल फळ दोन्ही येर येरां पाठीं ॥ ज्ञान वैराग्य तेंवि भक्तीचें

---

१ नवऱ्याची निंदा करणारी. २ व्यासाचा पुत्र. ३ पलीकडे. ४ पोटांत. ५ मोठेपणा.

